


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






# दीपावली



सप्टेंबर ७० ★ वर्ष २६ वे ★ मूल्य १॥ रु.

## श्रे य ना मा व ळी



**सुप्रिया कादंबरी** ◆ लेखक व छायाचित्रकार ◆ **पुरुषोत्तम बावकर**

**आणि**

**मा सि क बिं ग चि त्र मा ला**

**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**


टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किमत १॥ रु. + रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay-4.




अनुक्रमणिका




**दलाल आर्ट स्टुडिओ**
४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४
**टेलिफोन :** ★ **तारेचा पत्ता**
३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** : दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५; द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी ३० परदेशी वार्षिक वर्गणी रु. २०.

● **वर्गणी मनिऑर्डरने द्यावी.** चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवायचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातीचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : **श्री. दीनानाथ दलाल** यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.

# विजयोत्सवाची तयारी

आकाश अंधारून आलं. विजा चमकू लागल्या. आकाशातली म्हातारी मोठ्याने युगे युगे चाललेले दळण दळू लागली, धरती गंधवती झाली. बेडूक नावाचे ब्राह्मण वेदमंत्र म्हणू लागले. नद्या न्हाऊन निघाल्या आणि उत्साहाने बेभान होऊन नाचू लागल्या, सृष्टी हिरवा शालू नेसून सुख-समृद्धीची उधळण करण्यासाठी सज्ज झाली की ग्रीष्माचा दाह नाहीसा होतो. सरींच्या तालावर मंगलाची, सणांची नांदी झडू लागते. त्या सणांना किती नावं द्यायची आणि किती गाळायची ते कळेनासं होतं. सृष्टी आनंदाने नहात असते, आकाशाचे आनंदाश्रू पिऊन ती मोत्ये पिकवते आणि माणसांना उत्साहाचे उधाण येते. उत्साहाचे उधाण देणाऱ्या पहिल्या सणाचे नाव गणेशोत्सव ! ते मंगलाचे गान विजयाची प्रेरणा देते. मग येते विजयादशमी ! आणि विजय साजरा करण्यासाठी वाजत-गर्जत येते दीपावली ! सणांचा बादशहा ! आनंदाचा जणु सम्राट !

आकाश पाझरतं आहे आणि आम्हीही त्या आनंद-सम्राटाची आरती सुरू केली आहे. त्या आरतीत नुसते 'कोरडे' शब्द नाहीत. श्रद्धा, निष्ठा, साधना यांचे 'ओले' भाव आहेत. आणि म्हणूनच दीपावली पंचवीस वर्षांनंतरही सतेज, भाव–कोमल व कर्तव्यकठोर राहिली आहे. दिवाळी अंकाचे वेध लागले आहेत. ''यंदा खास काय ?'' म्हणून माणसे आवर्जून विचारू लागली आहेत. उत्तरासाठी गाठीला पुण्य असावे लागते. आम्ही ते जोडले आहे. (पंचविशीनंतर हे म्हणायला हरकत नसावी) दिवाळी अंकात एका सिद्धहस्त, नामवत लेखकाची 'दीपावली'साठी खास लिहवून घेतलेली कादंबरी असेल, अग्रेसर ठरलेल्या कथाकारांच्या 'अग्रगण्य' ठरतील अशा कथा (नुसती नावं नाहीत), नवीन संशोधन मांडणारे लेख, ललित लेख, आणि देशातल्या सध्याच्या राजकीय परिस्थितीवर आधारित ''बस्स झाला हा लोकशाहीचा फार्स'' ह्या विषयावरील नामवंत राजकीय विचारवंतांचा व निवृत्त सेनानींचा परिसंवाद, आणि 'विनोदी साहित्य स्पर्धे'तील 'यशस्वी' लेख, तरुण (तथाकथित तापसी) कवींच्या कविता, तर कवींनी लिहिलेले 'काव्यात्म' गद्य, दोन विंगचित्रमाला, भरपूर बिंगचित्रे, बहुरंगी, वेधक व संग्राह्य चित्रे (संस्कृत नाट्य नायिकांची), (तथाकथित) चक्रम चित्रकार पिकासो याच्या व्यक्तित्वाचा परिचय आणि प्रतिवर्षीप्रमाणे रंग-रंगांनीच नटलेलं मुखपृष्ठ ––––– दिवाळीच्या मेजवानीला याहून आणखी काय हवंय् ? आम्ही डिश् तयार केलीय. ताव तुम्ही मारायचा आहे. आनंदाची बरसात तुम्ही करून घ्यायची आहे. बाहेर सृष्टी न्हाते आहे. आम्हीही दिवाळीच्या त्या रंगी-बहुरंगी स्वप्नात न्हाऊन निघतो आहोत. तुम्हीही याल आणि आनंदाने न्हाऊन निघाल. पंचवीस वर्षांनंतर हा विश्वास तुम्ही बाळगायला हरकत नाही, नाही का ?

आम्ही नांदी म्हटली आहे. तुम्ही सूर मिसळून-जुळवून घ्या ! !

—संपादक





अनुक्रमणिका

# ध डा डी

हा शब्दच जणू आपल्या शब्दकोशातून नाहीसा झाला आहे पण 'दीपावली'च्या दिवाळी अंकाची प्रारंभीची घडाडी कायमच आहे.




दर्जेदार दिवाळी अंक

१९७०

रजत-महोत्सवी मानाचा शिरपेच डोक्यात खोवून आता सव्विसाव्या वर्षी अधिक थाटाने आपल्या भेटीला येत आहे

दिलचस्प मुखपृष्ठ! विविध रंगांची रंगपंचमी साजरी करणाऱ्या नयनरम्य आठ रंगीत कलाकृती म्हणजे दरवर्षीची प्रतिष्ठित भेटच ● त्याचप्रमाणे नामवंत आणि नवोन्मेषशाली साहित्यिकांच्या निवडक कथा नि कविता ● विचारप्रक्षोभक तसेच ललितरम्य लेख ● पारितोषिक विजेत्यांचे बेफाम विनोदी साहित्य ● चालू राजकारणावरील सोळापानी दुरंगी मर्मचित्रमालिका ● पानोपानी विखुरलेली उदर-विदारक हास्यचित्रे आणि

**श्रेष्ठ दर्जाची कादंबरी! लेखक?**

वार्षिक वर्गणीदारांना त्यांच्या वर्गणीतच दिवाळी अंक भेट म्हणून मिळतो

दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रिज, मुंबई-४

मूल्य ४ रुपये +
रजि. पो. १ रु.

पृष्ठ २२५ वर



अनुक्रमणिका

देशासाठी जीवितावर निखारे ठेवणारे

# गोमंतकीय स्वातंत्र्यवीर डॉ. तेलु मास्कारेन्यस



● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ●

**वयाच्या एकूणपन्नासाव्या वर्षी पोर्तुगीजांच्या न्याय-मंत्रालयातील ऐषआरामी आणि लठ्ठ पगाराच्या नोकरीवर लाथ मारून खडतर वनवास पत्करणाऱ्या तेजस्वी देशभक्ताची ओजस्वी कहाणी……**

लक्ष्मीदास बोरकर

मलबार हिल व पेडर रोड याच्या दरम्यान अल्टामाउन्टा रोड एका नागमोडी वळणाच्या टेकडीवरून जातो. या भागात श्रीमंतांच्या आलिशान हवेल्या आहेत. टेकडी चढल्यानंतर बऱ्याच वेळाने 'दिलखूष' नांवाची आलिशान इमारत लागते. या इमारतीच्या तळमजल्यावरील फ्लॅट. दरवाजावरील विद्युत् घंटी वाजविली जाते. थोड्याच वेळात दरवाजा उघडतो. एक सुहास्य वदनी गृहिणी आतिथ्यशीलतेने स्वागत करते. ती मला प्रशस्त दिवाणखान्यात घेऊन जाते.

सनमाइकाच्या नितळ टेबलापाशी बसून एक गृहस्थ लिहिण्यात मग्न आहेत. त्यांना जगाचा पार विसर पडलेला आहे. बराच काळ उपाशी पोटी असलेली, भुकेने वखवखलेली व्यक्ती कशी अन्नावर तुटून पडते तशी ती व्यक्ती अधाशाप्रमाणे लेखन स्वातंत्र्याचा आनंद मनसोक्त लुटत होती.

त्यांच्या उजव्या हाताजवळ व्यवस्थित टंकलिखितकाव्य पंक्तीचा सर पडलेला होता. मी सहज कुतुहलाने त्या काव्यपंक्तीच्या निर्मात्याचे नांव पाहिले.

"तेलु द मस्कारेन्यास उपेन्द्र राज' दहा वर्षांनंतर पोर्तुगालच्या बंदिवासातून मुक्त होऊन मायभूमीला परतलेल्या या स्वातंत्र्यवीराचे नाव 'डॉ. तेलु मस्कारेन्यास' असे आहे एवढंच मला माहीत होतं. परंतु, कायशिअस किल्ल्याच्या तुरुंगातून बाहेर आल्यावर डॉक्टरसाहेबांच्या नावामागे ही 'उपेन्द्र राज'ची पदवी केव्हा अन् कशी काय लागली बुवा अशा विचारात पडलो. त्यांच्या ते लक्षात आलं असावं. ते म्हणाले,

"होय. ते माझंच संपूर्ण नाव आहे. परंतु, पोर्तुगीजांनी ते मला वापरायला दिलं नाही. तरीसुद्धा मी ते वापरीतच होतो. आज तर ते माझ्या भारतीय पासपोर्टवर लिहिलं आहे."

### तरणाबांड 'म्हातारा'

वय मावळतीकडे झुकलेलं. केसांच्या काळ्या रंगानं आपलं तोंड कधीच 'काळं' केलंय अन् त्या जागी रुपेरी बरसात झालीय. तरी पण हा वीर गडी ताठ आहे.

अनुक्रमणिका

मोडेन पण वाकणार नाही ही जिद्द कायम बाळगून आहे. सत्तरी ओलांडलेला हा 'म्हातारा' तरण्याबांड युवकाला लाजवील अशा ताठ कण्याने वावरतो आहे. त्याच्या चेहऱ्यावर हास्य व निर्धाराचं तेज मुळीच मावळलेलं नाही. या निर्धाराच्या बळावरच बंदिवासातील दहा वर्षांच्या काळात त्यांचं नीतीधैर्य अविचल राहिलं असावं.

## निःस्पृह बाणेदारपणा

डॉ. मस्कारेन्यास म्हणाले, 'गोव्यात अटक करून मला पोर्तुगालला आणले. काही काळ मला मोकळे ठेवण्यात आले होते. परंतु, रोज पोलिस ठाण्यावर हजेरी लावण्याचा निर्बंध माझ्यावर लादण्यात आला होता. निवासस्थानावर मुफ्तीतील पोलिस ठेवण्यात आले होते. मी जेथे जेथे जायचो तेथे तेथे पोलिसांचा ससेमीरा माझ्या मागं असायचा. मला येणारे टेलिफोन कॉल मधल्यामधे टॅप केले जायचे. माझ्यावरील खटल्याची सुनावणी सुरू करण्यापूर्वी सरकारी वकिलाने मला खाजगीरीत्या विचारलं होतं की, आपण केलेल्या 'देशद्रोही' कृत्यांबद्दल पश्चाताप होतो असा लेखी जबाब दिलात तर आपणास मुक्त केलं जाईल. इतकंच नव्हे तर आपणास सन्मानानं वागविलं जाईल. बड्या पगाराची नोकरी दिली जाईल वगैरे वारेमाप आमीषं दाखविली होती. पण मी त्यांना निक्षून सांगितले की, **"प्राण गेला तरी बेहत्तर. आपण माझं डोकं उडविलं तरी माझ्या मुखावाटे माफीचा शब्द उच्चारला जाणार नाही. मी भारतीय आहे. गोव्यात तुम्ही पोर्तुगीजच उपरे आहात. मला भारतीयत्वाचा सार्थ अभिमान वाटतो."**

डॉ. मस्कारेन्यास यांच्या तडफदार चपराकीमुळे पोर्तुगीज अधिकाऱ्यांनी चिडून त्यांच्यावरील दोन वर्षांहून अधिक काळ रेंगाळत ठेवलेला खटला निकालात काढला व त्यांना २७ वर्षांची घोर सजा फर्मावली.

## सनदी नोकराचा देशभक्त

डॉ. मस्कारेन्यास यांचा आवाज कोमल आहे. वर्तन उच्च संस्कारयुक्त आहे. उच्च शिक्षण पोर्तुगालमध्ये झालं आहे. १५ वर्षांचा काळ त्यांनी पोर्तुगालच्या न्याय मंत्रालयात नोकरी करण्यात घालविलेला. अशा या ज्येष्ठ सनदी नोकराने वयाच्या ४९ व्या वर्षी सरकारी ऐषारामी नोकरीवर लाथ मारून प्रखर देशभक्ताचं सतीचं वाण हाती घेण्यास उद्युक्त व्हावं हे खरं वाटत नाही. पटत नाही.

## प्रखर लिखाण

डॉ. मस्कारेन्यास विद्यार्थीदशेत असतानासुद्धा निर्भीडपणे लिखाण करायचे. लिस्बन व कोईम्ब्रा विद्यापीठात कायदा व अर्थशास्त्राचे अध्ययन करीत असताना ते नियमितपणे 'इंदिय नोव्ह' या गोमंतकीय विद्यार्थी पत्रात लिहायचे. १९२७ साली त्यांनी गोव्यातील 'भारत' या साप्ताहिकात 'मूर्तीचा मृत्यु' या शीर्षकाखाली एक लेख लिहिला. या लेखात त्यांनी गोमंतकीयांवर लादण्यात आलेल्या पोर्तुगीज बीरांवर प्रखर प्रहार केले होते. या लेखापायी त्यांना कोर्टाची पायरी चढावी लागली. तरी त्यांनी आपलं लिखाण चालूच ठेवलं. त्यांनी टागोर यांच्या कादंबऱ्या, महात्मा गांधी यांचे आत्मचरित्र इत्यादींचे अनुवाद केले.

## गांधीजींचा सच्चा अनुयायी

मी त्यांच्या चेहऱ्याकडे निरखून पाहिलं. तेथे मला वादळी प्रवासाच्या कोणत्याच खाणाखुणा आढळल्या नाहीत. फक्त दिसली ती त्यांच्या भेदक डोळ्यातील थकल्याची छटा. शरीर अद्याप टवटवीत आहे. मन अतिशय उल्हसित आहे. दुर्दम्य उत्साह ओसंडून वाहातो आहे. याबाबतीत विचारणा केली असता डॉ. मस्कारेन्यास म्हणाले,

'मी पडलो महात्मा गांधींचा अनुयायी. माझ्याजवळ लपवाछपवीचा प्रकार नव्हता. जे काही मनात होतं ते खुल्लंखुल्ला बोलून दाखवायला मी कधीच कचरलो नाही. मी सत्याग्रही आहे हे पोर्तुगीज अधिकाऱ्यांना पूर्णपणे माहीत होतं. म्हणून त्यांनी मला तुरुंगात कधीच अमानुष वागणूक दिली नाही. परंतु आप्तेष्टांपासून, देशबांधवांपासून दूर, एकाकी एकलकोंडे जीवन पोर्तुगीजांनी माझ्यावर लादल्यामुळं मी मानसिक दृष्ट्या फारच खचलो होतो. निराशेनं मला ग्रासलं होतं. अशा वेळी माझी प्रिय पत्नी एल्सा हिच्याकडून वेळेवर येणारी पत्रं व तुरुंगात केलेली काव्यरचना याच्या जोरावर मला तेथलं जीवन सुसह्य झालं.

## तुरुंगातील लेखन

डॉ. मस्कारेन्यास यांनी तुरुंगात शंभरावर कविता लिहिल्या. काही अस्वस्थ मनःस्थितीत असताना लिहिल्या. इतर काही खुषीत असताना लिहिल्या. काही कविता वक्रोक्तीपूर्ण आहेत. भारतीय संस्कृतीवर काही निबंध लिहिले. एक कादंबरी व 'जेव्हा आम्रवृक्षाला मोहोर येतो' या पुस्तकातील काही प्रकरणे लिहिली. या पुस्तकात त्यांच्या आठवणी आहेत. काही सत्य गोष्टी तर काही काल्पनिक आहेत असे डॉ. मस्कारेन्यास यांनी सांगितले. हे पुस्तक त्यांना तुरुंगात पूर्ण करता आले नाही. कारण त्याचा काही भाग राजकीय घडामोडीशी संबंधित होता. ते पुस्तक ते आता पुरे करणार आहेत.

## नवे संकल्प

डॉ. मस्कारेन्यास यांनी मृच्छकटिक नाटकाचा पोर्तुगीज भाषेत अनुवाद केला आहे. कालिदासाचे शाकुंतल, उर्वशी वगैरेचा अनुवाद केला आहे. छत्रपती शिवाजी महाराजांवर महाकाव्य लिहिण्याचा त्यांचा मानस आहे. भारतीय संस्कृतीचे पोर्तुगीज जनतेला खरेखुरे दर्शन घडविण्यासाठी उत्तमोत्तम भारतीय ग्रंथांचे पोर्तुगीज अनुवाद सादर करण्याचा संकल्प त्यांनी मनात केला आहे. या कामी त्यांना आवश्यक ती माहिती व संदर्भ ग्रंथ हवे आहेत. पणजीतील मुक्कामी डॉ. मस्कारेन्यास हे लेखन-कार्य करणार आहेत. या कामी गोव्यातील महाराष्ट्र माहिती व प्रचार केंद्राकडून साहाय्य मिळावे अशी त्यांची अपेक्षा आहे.

## सालाझार व मस्कारेन्यास

**एवढा त्याग केला, पोर्तुगीज तुरुंगात मानसिक क्लेश सोसले तरी डॉ. मस्कारेन्यास यांच्या मनात पोर्तुगीजांविषयी**






कडवटपणाची भावना निर्माण झालेली नाही अगर निराशावादाने त्यांना झपाटलेले नाही. पोर्तुगालचे हुकूमशहा डॉ. सालाझार यांचे निधन व डॉ. मस्कारेन्यास यांचे स्वदेशी आगमन एकाच दिवशी झाले हा विलक्षण योगायोग. डॉ. सालाझार हे त्यांचे गुरु. कोईम्ब्रा विद्यापीठात अर्थशास्त्राचे धडे त्यांनी सालाझारकडून घेतले. डॉ. मस्कारेन्यास म्हणतात, 'शिक्षक या नात्याने डॉ. सालाझार यांनी आम्हांला अगदी मित्रत्वाने वागविले. त्या काळात त्यांना आमच्या राष्ट्रीय विचारांचे वावडे नव्हते. परंतु, माणसे सत्तेवर येताच बदलतात. सर्व साम्राज्यवाद्यांची तीच गत आहे. पंतप्रधानपदी आरूढ झाल्यावर त्यांनी कुणालाही आपल्या चेंबरमध्ये फिरकायला दिलं नाही. माझी त्यांची नंतर कधीच गाठ पडू शकली नाही. मध्यंतरी मी त्यांना एक पत्र पाठविलं व गोव्यातील खरी परिस्थिती त्यांच्या नजरेस आणून दिली. सालाझारनी माझ्या या पत्राला उत्तर पाठविलं नाही. परंतु पोर्तुगीज पार्लमेंटमधील एका भाषणात नांवाचा उल्लेख न करता माझ्या पत्राची दखल घेऊन उत्तर दिले. 'गोव्यातील परिस्थिती गंभीर असून आपण ती निराळ्या पातळीवरून हाताळणे आवश्यक आहे' असे प्रतिपादन सालाझारनी उत्तरादाखल केले.

## पोर्तुगालमधील परिस्थिती

पोर्तुगालमधील राजकीय परिस्थितीविषयी बोलताना डॉ. मस्कारेन्यास म्हणाले, 'तेथील राजकीय परिस्थिती भयंकर आहे. तरुणांना सक्तीनं लष्करात भरती केलं जातं व त्यांना आफ्रिकेत राष्ट्रवाद्यांच्या स्वातंत्र्य आंदोलनाचा बीमोड करण्यासाठी पाठविलं जातं. लष्करी भरतीचा वरवंटा टाळण्यासाठी असंख्य तरुण मंडळी देश सोडून जात असतात. उदरनिर्वाहासाठी जर्मनी वगैरे युरोपियन देशात आसरा घेतात.

पोर्तुगाल हा औद्योगिकदृष्ट्या मागास व अविकसित देश आहे. अत्यंत गरीब देश आहे. तेथील लोकांचा राहणीचा दर्जा अगदी खाली आहे. लोकांना रोजगार मिळत नाही. त्यामुळे बेकारीचा भस्मासूर माजला आहे. बेकारीपायी अनेक लोक स्थलांतर करीत आहेत. करआकारणीचे प्रमाण भारी आहे. सामान्य लोक पावाच्या चार स्लाईसी व भाजीपाला खाऊन वेळ निभावून नेतात.

## देश परकीयांना विकला

पोर्तुगालचा निभाव कसा काय लागतो असे विचारले असता डॉ. मस्कारेन्यास म्हणाले, 'पोर्तुगीज सत्ताधाऱ्यांनी आपला देश बड्या पाश्चात्य देशांना विकला आहे. पोर्तुगालचा वैजसारखा समृद्ध भाग पर-राष्ट्राच्या स्वाधीन केला आहे. असोरिश या बेटावर अमेरिकेने महायुद्धात आपले युद्धतळ स्थापन केले होते ते अद्याप तेथे कायम आहेत. दारू, बुचे वगैरे उद्योगधंद्याची मक्तेदारी परदेशी कंपन्यांच्या हाती आहे. अंगोला व मोसंबिक या आफ्रिकन वसाहतीमधून मिळणाऱ्या कच्च्या मालावर पोर्तुगालच्या अर्थव्यवस्थेचा डोलारा कसाबसा उभा आहे. तेथील उत्पन्नावरच पोर्तुगाल जगत आहे. सध्या अंगोला व मोसंबिक या वसाहतीत आफ्रिकन जनतेने सशस्त्र बंडाचा झेंडा उभारला आहे. उद्या हे बंड यशस्वी होऊन या दोन्ही

(पान ५८ वर पहा)

—प्राचार्य मनोहर माधव आळतेकर



# मी पाहिलेले व ऐकलेले अत्रे

[उत्तरार्ध]

प्रो. कृ. पां. ऊर्फ नानासाहेब (नानासाहेब हे नावही अत्र्यांनीच ठेवले. घरात शेवटपर्यंत बापूच होते. पण बापूंचे नाना कसे झाले ही एक कथाच आहे. अत्र्यांच्या लग्नात गोदुताई जशा सुधाताई झाल्या त्याप्रमाणे कुलकर्णी नाना झाले) कुलकर्णी हे अत्र्यांचे परममित्र व रोजच्या बैठकीतले. यांच्या अनेक गोष्टी अत्र्यांच्या संग्रही होत्या. त्यातील काही खुद्द अत्र्यांनीच त्यांच्यावरील लेखात प्रसिद्ध केल्या आहेत. पण एक गोष्ट, जी अप्रकाशित आहे अशी माझी समजूत आहे, ती स्वभावजन्य व प्रसंगनिष्ठ विनोदाचा उत्तम नमुना आहे.

एकदा नानासाहेब कुलकर्णी आणि त्यांचे दोन मित्र तमाशाला गेले. त्यातील लावण्या ऐकून तिघेही बेहद्द खूष झाले. गायिकेला बोलावून गाण्याचा खाजगी कार्यक्रम करावयाचा आणि तो फक्त तिघांनी ऐकावयाचा असे ठरले. नंतर प्रत्येकाने फक्त आपल्या एका मित्राला बोलवावे असे दुरुस्ती विधेयक मंजूर करण्यात आले. पण प्रत्यक्ष कार्यक्रमाच्या वेळी बैठक ५०-६० श्रोत्यांची भरली. कारण प्रत्येक मित्राने आपला एक मित्र आणि त्या एका महाभागाने आणखी एक पडमित्र असे मारुतीचे शेपूट लांबत गेल्यामुळे एकांतात लावण्य-गीते ऐकावीत म्हणून बेत रचणारे बिचारे तीन शिलेदार "पाहुण-चार" या खास भारतीय सांस्कृतिक मूल्याचा पाठपुरावा करीत कॉफीचे मोठे पातेले रात्रभर ढवळीत बसले. बहुधा या क्षणापासून वैतागून प्रा. कृ. पां. कुलकर्णी भाषाशास्त्र व व्याकरण यांच्यामागे हात धुऊन लागले असावेत.

म. म. दत्तो वामन पोतदारांच्या अनेक गोष्टी अत्र्यांच्या जिभेच्या टोकावर नाचत असत. दोन्ही घरचा पाहुणा उपाशी असे म्हणतात पण पोतदार बंधूंच्याकडे (दत्तोपंत व दामुअण्णा) सतत महिनाभर आपले पाल ठोकणाऱ्या एका पाहुण्याने वरील वचन कसे खोटे पाडले ती गोष्ट अत्रे रंगवून सांगत. काही दिवस गेल्यावर तर हा पाहुणा मला अमुक पाहिजे आणि तमुक पाहिजे अशी आज्ञापत्रके काढू लागला दोघेही भाऊ या पात्राला कंटाळले, रागावले पण आपल्या भावाचा पाहुणा आहे म्हणून धुमसत गप्प बसले. पण शेवटी एक दिवस स्फोट झाला आणि दोघेही जण तुझा पाहुणा तुझा पाहुणा करीत तोंडघाईवर आले, तेव्हा पत्ता लागला की आपल्या घरात ठाण मांडून बसलेले पाहुणे महाराज कोणाचेही नाहीत. आणि नंतर एकाने एक व दुसऱ्याने दुसरा कान धरून पकडून अतिथीला अलगद घराबाहेर नेऊन ठेवले.

कधी कधी अशा सुरस कथांचे केंद्रबिंदू खुद्द अत्रेच असत. साष्टांग नमस्कार नाटकाचे ५-१० प्रयोग झाल्यानंतर अत्रे एकदोन दिवसांकरता महाबळेश्वरला गेले. ज्यांना प्राणसंकटातून मागे वाचविले ते आमचे शेजारी समवेत होते. हातात असलेल्या बाटली-तील तीर्थ मघूनमघून प्राशन करीत ही जोडगोळी महाबळेश्वर पादाक्रांत करीत असताना साष्टांग नमस्कार नाटकातील राव-बहादुरांचे पात्र अत्र्यांना ज्यांच्यावरून स्फुरले ते औंधचे राजेसाहेब—बाळासाहेब पंतप्रतिनिधी—दत्त म्हणून समोर उभे राहिले. पांड-वांच्या शस्त्राप्रमाणे दोघांनी आपल्या बाटल्या निकट असलेल्या









अनुक्रमणिका

झाडाआड लपविल्या. अत्र्यांची ओळख नव्हती पण राजेसाहेबांचा व आमच्या शेजाऱ्यांचा उत्तम परिचय होता. नमस्कार (साष्टांग नव्हे !), चमत्कार आणि हवापाणी वगैरे झाले आणि राजेसाहेबांनी विचारले, "हे कोण?" "हे अत्रे—पुण्याच्या शाळेत—" "बरे, बरे. उद्या यांनाही घेऊन सकाळी बंगल्यावर या."

दुसरे दिवशी सकाळी हे नरपुंगव बंगल्यावर गेले. मधल्या काळात कोणातरी खलपुरुषाने साष्टांग नमस्कार नाटकाची बातमी राजेसाहेबांच्या कानावर घातली होती. जाताक्षणीच राजेसाहेबांनी नाटककाराची अक्षरशः नसली तरी अलंकारिक अर्थाने मानगूट पकडली आणि विचारले, "अत्रेसाहेब ! आमची व साष्टांग नमस्काराची चेष्टा करणारे तुम्ही नाटक लिहिले आहे आणि त्याचे पुण्याला प्रयोग चालू आहेत ?" अत्र्यांचे प्रसंगावधान जबरदस्त. त्याकाळी मिरजेचे राजेसाहेबही साष्टांग नमस्कारांचे मोठे पुरस्कर्ते होते. दोघेही बाळासाहेब. अत्र्यांनी तावडतोब जबाब दिला, "सरकार, ते नाटक मी आपल्यावर लिहिले नाही. बाळासाहेब मिरजकरांच्यावर लिहिले आहे."

"फार चांगले केलेत. अहो, या बाळासाहेबांना शास्त्रोक्त नमस्कारच घालता येत नाहीत. त्यामुळे आता स्वारी पायाने पांगळी होऊन पडली आहे."

"सरकार, हा आमचा देह एकसारखा वाढतोच आहे. रोज नमस्कार घालावेत—"

"उत्तम ! चांगले हजार नमस्कार घाला" इति राजेसाहेब.

"पण शास्त्रोक्त नमस्कार कसे घालावयाचे याचे प्रात्यक्षिक दाखवा नाहीतर एक करता एक व्हायचे आणि मिरजेच्या राजेसाहेबांप्रमाणे जन्माचे पांगळेपण यावयाचे !"

"बरोबर आहे", असे म्हणून राजेसाहेबांनी लंगोट कसला आणि अत्र्यांच्यासमोर बारा नमस्कार घालून दाखविले. दुसरे दिवशी कोंबडा आरवण्याच्या अगोदरच अत्र्यांनी पुण्याला पोबारा केला.

### 'खोटे कधी बोलू नये'चा धडा

'खोटे कधी बोलू नये' हे आपल्याला कसे पटले याबद्दल अत्रे एक गोष्ट सांगत. त्यावेळी अत्रे पुण्यात हेडमास्तर होते. त्यामुळे सकाळचा वेळ मुलांच्या वह्या तपासणे, शिकविण्याची पूर्वतयारी करणे यात जाई. अण्णासाहेब कर्व्यांच्या अनाथ महिलाश्रमाचे व हिंगण्याच्या शाळेचे गोमा गणेश चिपळूणकर म्हणून एक कार्यकर्ते शिक्षक होते. गृहस्थ जितका सज्जन तितकाच गोष्टीवेल्हाळ ! एक दिवस सकाळच्या वेळी सूर्यापाठोपाठ गोमा गणेश चिपळूणकर अत्र्यांच्या घरी उगवले. अत्रे माडीवर बसले होते. सुधाताईंना अत्र्यांनी 'मी घरात नाही' म्हणून सांग अशी सूचना केली.

'अत्रे नसतील पण आपण तर आहात' असे म्हणत चिपळूणकर खुर्चीवर टेकले. कारण सुधाताईंचा व त्यांचाही उत्तम परिचय होता. थोडा वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर सुधाताईंनी चहा केला; पण अत्रे अधिकृतरीत्या घरी नसल्यामुळे ते माडीवर कोरडेच राहिले. जवळजवळ तास-दीडतास संभाषण झाल्यावर सुधाताईंची शाळेत जाण्याची वेळ झाली. चिपळूणकरांना त्यांनी विचारले, 'जेवता का ?' चिपळूणकर खुर्चीवरून उठले व पाटावर बसले. आणि वर अत्रे 'खोटे कधी बोलू नये' ही कवितेची ओळ म्हणत बसले. वेळापरी वेळ गेला, चहा गेला नि जेवणही गेले. तेव्हापासून अत्र्यांनी निश्चय केला की 'खोटे कधीही चुकूनसुद्धा बोलावयाचे नाही.'

'मी कसा झालो' या आत्मचरित्रात अत्र्यांनी लिहिलेल्या अनेक गोष्टी' आम्ही अगोदरच ऐकल्या होत्या. विशेषतः वसंतसेना चित्रपट पडल्यावर केवळ आर्थिकच नव्हे तर अनेक आघाड्यांवर जे जबरदस्त नुकसान झाले आणि त्यामुळे जो तीव्र मनस्ताप झाला त्या काळात अत्रे रोज समुद्रावर म्हणून हिंडावयास बाहेर पडत, थोडाफार फेरफटका करीत आणि आमच्या घरी येऊन दोन तीन तास गप्पा मारीत बसत. एक कापडाची लाकडी आरामखुर्ची होती त्यावर आसनस्थ होत आणि चहा पीत पीत एकेक गोष्ट आम्हाला ऐकवीत आणि आम्हाला हसवीत. पण आश्चर्याची गोष्ट ही की कधीही आपल्यावर आलेल्या अनेक संकटांचा त्यांनी एका अक्षरानेही उल्लेख केला नाही. पुढे सात आठ महिन्यांनंतर अत्रे चरित्रातील हे 'वनपर्व' इतरेजनांकडून आम्हाला कळले. अशाच एका सुप्रभाती "अजगराच्या विळख्यात" किंवा "मी गुन्हेगार कसा झालो ?" ही अद्भुतरम्य आणि तितकीच भीषण कथा अत्र्यांनी सांगितली. आम्ही चौघेजण (आजी, वडील, आई आणि मी) डोळ्याचे पातेसुद्धा लवू न देता जवळजवळ तीन तास अत्रेउवाच ऐकत होतो. घड्याळाचा काटा दहावर आला की आमचे तीर्थरूप कॉलेजला जाण्यासाठी चुळबूळ करू लागत. कारण नानासाहेब कुलकर्ण्यांच्या शब्दात सांगावयाचे म्हणजे कॉलेजात वेळेवर कीर्तन हे उभे राहिलेच पाहिजे. अत्रे जोरात वडिलांना म्हणत, "बसा हो माधवराव, कसले कॉलेज आणि कसला तास घेऊन बसलात ! परवाच एक मजा झाली." ब्राह्ममुहूर्तावरही भोजनास उत्साहाने तयार असणाऱ्या माझ्या वडिलांना सकाळचे साडेदहा वाजले की ब्रह्माण्ड आठवत असे. मग अत्रे आरामखुर्चीमधून उठत आणि दुसरे दिवशी सकाळी. "पुनरागमनाय च" स्वगृही गमन करीत.

अत्र्यांना गोष्टी सांगण्याइतक्याच गोष्टी ऐकण्याचा मनस्वी नाद होता. अत्रे नुसताच बोलका ढलपा नव्हते ते जागरूक व उत्सुक श्रोतेही होते. एखाद्या अडाणी माणसाने, लहान मुलाने किंवा माजघरातील वयोवृद्ध आजीबाईने गोष्ट सांगितली तरी अत्रे ती कान टवकारून ऐकत. एखादे आकर्षक आणि मनुष्य स्वभावावर वा जीवनावर वेगळाच प्रकाश टाकणारे वाक्य ऐकले की त्याचा त्यांच्या अलौकिक स्मरणशक्तीच्या खजिन्यात संग्रह झालाच म्हणून समजावे. कधी भाषण करतांना, कधी गप्पा मारताना, कधी लेखात तर कधी नाटकात हे 'परवाङ्मय' आपल्यापुढे हसतमुखाने उभे राही.

### अहोरात्र भरणारा खिलखुलास दरबार

अत्र्यांचा खास दरबार होता. शेवटचे चारपाच दिवस सोडल्यास हा दरबार अक्षरशः अहोरात्र भरत असे. कधी हा दरबार जनता-

( पान ५२ वर पहा )






पुढले मूल आत्ता नाहीं



तीन नंतर·कधीच नाहीं

davp 70/152












अनुक्रमणिका



# टेम्पल व्ह्यू ! छेः एक भयानक व्ह्यू !

—ना. व्यं. देशपांडे

तेवीस ऑक्टोबर एकोणीसशेसदुसष्टची पहाट. ती नुक्तीच कुठे फुटली होती. ह्यूजेस् रोड जवळ जवळ निर्मनुष्य होता. सगळीकडे विचित्र स्तब्धता पसरली होती. ऑक्टोबरच्या उकाडयामुळे कसे गुदमरल्यासारखे होत होते. या विचित्र स्तब्धतेला अपवाद होता तो दुधाच्या वाटल्यांच्या आवाजाचा. मुंबईतील पहाट वाटल्यांच्या आवाजानेच जागी होते. उस्मान दुधाच्या वाटल्यांचा पिंजरा घेऊन आपल्याच नादात आपल्या मालकाच्या घरी चालला होता. मधूनच तो आपली वोटे त्या वाटल्यांवरून फिरवी. त्या उकाडयामध्ये वाटल्यांचा थंडगार स्पर्श मोठा सुखावह वाटत होता. माणसाच्या कलेवरचा स्पर्शही असाच थंडगार लागत असेल का ? एक विचित्र विचार त्याच्या मनात चाटून गेला ! त्या विचाराक्षणीच त्याचे शरीर शहारले. दुसऱ्या क्षणीच, तो विचार झटकून टाकावा म्हणून की काय तो झपाझप पाऊल टाकू लागला.



**हेच ते दुर्दैवी कुटुंब !**
**डावीकडून–महंमद सिद्दीक चुनावाला, सौ. फातमावाई चुनावाला, .शुजाउद्दीन (जांवई) जहिरा (मुलगी),**

त्याचे मालक महंमद सिद्दिक चुनावाला हे काही फार दूर राहात नव्हते. दूधकेंद्रापासून थोडयाच अंतरावर ह्यूजेस् रोड आणि ओव्हेंडम् रोड यांच्या नाक्यावर 'टेंपल व्ह्यू' या नावाची इमारत आहे. या इमारतीतील तळमजल्यावरील डाव्या हाताच्या फ्लॅटमध्ये चुनावाला राहात. खरं म्हणजे, दुधाच्या वाटल्या पोचविणं यासाठी काही उस्मानची नेमणूक नव्हती. तो होता त्यांच्या दुकानाचा रखवालदार. 'टेंपल व्ह्य'पासून सुमारे फर्लांग दीड फर्लांगाच्या अंतरावरच त्यांचे 'कार मार्ट' हे मोटार विक्रीचे दुकान होते. त्यांचे म्हणण्यापेक्षा 'कार मार्ट' या लिमिटेड कंपनीचे म्हणणे अधिक संयुक्तिक होईल. या कंपनीचे ते मॅनेजिंग डायरेक्टर होते. त्यामुळे धंद्याची सूत्रे त्यांच्याच हातात होती. या दुकानात उस्मान वॉचमन म्हणून






**....आपल्या दुष्ट खुनी कृत्याला कुणीही साक्षीदार नसावा यासाठीच गुंडांनी त्या कोवळ्या पोराचा गळा चिरला असावा....तसे करताना त्याचा हात क्षणमात्र तरी थरथरला असेल काय? घरच्या भिंतींना वाचा फुटली तरच या प्रश्नाचे उत्तर मिळेल....**

काम करीत असे. त्याची पाळी दुपारी साडेचारच्या सुमारास सुरू होई, ती दुसऱ्या दिवशी सकाळी आठाला संपे. पाळी संपण्याच्या पूर्वी तो चुनावाला यांच्या घरी दूधकेंद्रावरील वाटल्या पोचविण्याचे काम करी. दररोज संध्याकाळी काळोख पडण्याच्या सुमारास उस्मान घरी येई. दुधाच्या रिकाम्या वाटल्या आणि पसे घेऊन जाई. चुनावालांची पत्नी फातमावाई मोठी हुशार आणि व्यवस्थशीर होती. दूधकेंद्रावर दररोज सुटचा पैशाची अडचण व्हायला नको म्हणून ती एक रुपया सत्तर पैशांच्या नाण्यांच्या पुडचाच वांधून ठेवीत असे. उस्मानला पैसे मोजण्याचा त्रासच नसे. डोळे मिटून एक पुडो खिशात टाकायचो. वाटल्या उचलायच्या आणि चालायला लागायचे !

इमारतीच्या पायऱ्या चढून वर गेले की डाव्या हाताला चुनावालांचा फ्लॅट. उजव्या वाजूस वाडिया नावाच्या पारशीण वाईचा फ्लॅट. डाव्या हाताला चुनावालांच्या घराचे प्रवेशद्वार. नाकासमोर दिसणारे दार ते त्यांच्या स्वयंपाकघराचे. स्वयंपाकघरात त्यांच्या दाईचे काम करणारी ॲनी फर्नांडिस हिचे अधिराज्य असे. प्रवेशद्वारावरचे घंटचे वटण दावले की स्वयंपाकघरातील घंटी वाजे. ॲनी दार उघडत असे. यजमानांना भेटण्यासाठी कोणी आलेले असले तर ती आतल्या वाजूने जाऊन प्रवेशद्वार उघडी. एरवी घरावाहेर जाण्यासाठी याच दरवाज्याचा ती उपयोग करी. रात्रीचे काम आटोपल्यानंतर ती आपली पथारी तेथेच फरशीवर टाकून झोपत असे. पहाटे घंटी वाजली की स्वयंपाक घराचा हा दरवाजा उघडून दुधाच्या वाटल्या घेई. त्या पोचविल्यानंतर उस्मान परत आपल्या कामाला निघून जाई.

इमारतीच्या कंपौंडमध्ये शिरून उस्मान पायऱ्या चढतो न चढतो तोच त्याला प्रवेशद्वारासमोरील खुल्या जागेत–ओटीवर–मिस्त्री आचारी सचिंत मुद्रेने उभा असलेला दिसला. 'सलाम आलेकुं' उस्मानने त्याला अभिनंदन केले. मिस्त्री अबोलच राहिला. त्याने न बोलताच, 'जवळ ये' अशी खूण केली. मिस्त्री–त्याचं खरं नाव होतं सय्यद अहमद सय्यद आव्वास, पण सर्वजण त्याला मिस्त्रीच म्हणत–हा चुनावालांचा स्वयंपाकी. रात्रीचा स्वयंपाक-जेवण वगैरे आटोपले की वाहेर, दरवाजासमोरील खुल्या जागेत आपली वळकटी पसरून तो झोपी जाई. सकाळी उठताच आपली वळकटी जिन्याखालच्या पोकळीत ठेवून देई.

"उस्मान, दरवाजा कोणीही उघडत नाही. मी दारावर टकटक केली. घंटीही वाजवली. ॲनीने काही दरवाजा उघडला नाही. अर्ध्या तासापूर्वी पारशी डेअरीचा भय्याही येऊन गेला. शेवटी त्यानं मला उठवून दूध घ्यायला लावलं. मी ते वाडियावाईच्या घरी ठेवलं आहे. मघाशी वरच्या माळ्यावरचा मगन मला सांगून गेला की, घराच्या खिडक्या-दारातून धूर निघतो आहे. मी आताच घराभोवती एक चक्कर टाकून आलो. खरंच, खिडक्या दारांतून धूर निघतो आहे. काय काय करावं ते मला सुचेना. मी परत आताच येऊन इथं उभा राहिलो, इतक्यात तू आलास. वरं झालं...."

मिस्त्री हे वोलत असतानाच उस्मानचे लक्ष घराच्या प्रवेशद्वाराकडे गेले. दार पक्के लावलेले नसावे असा त्याला संशय आला. कारण दिसेल न दिसेल अशा वेताची फट तेथे राहिली होती. त्याने पुढे होऊन दाराला किंचित धक्का दिला तेव्हा ते तावडतोव उघडले. दोघेही आत शिरताच त्यांनी घरातील वाहेरच्या ओसरीवरचा दिवा लावला. उजव्या हाताला भोजनगृह होते. ते रिकामेच होते. भोजनगृहाला प्रदक्षिणा घालून ते मागील ओसरीपाशी आले. तेव्हा त्यांना मागील ओसरीत कपड्यांचे आणि रद्दी पेपरांचे ढीग अस्ताव्यस्त पसरलेले दिसले. त्यातून धूर धुमसत होता.

"मिस्त्री, घराला आग लागलेली दिसतेय्. पळ. पाणी आण लौकर." उस्मानखान वोलला.

दोघांनीही त्या ओसरीत असलेली प्लॅस्टिकची वादली उचलली. वाजूच्या न्हाणीत जाऊन पाणी भरण्याचे भानही त्यांना राहिले नाही. ओसरीच्या भिंतीला लागूनच जो वॉशवेसिन होता त्यामध्ये वादली कशीवशी आडवी धरून त्यांनी अर्धवट पाणी भरले आणि ते पाणी त्या ढिगाऱ्यावर सपकारू लागले. पाण्याचा सपकारा मारल्याक्षणीच एकदोन वर्तमानपत्रे वाजूला झाली. वर्तमानपत्रे वाजूला झाल्यानंतर ज दृश्य उस्मानच्या दृष्टीस पडले ते पाहून तर त्या दोघांची वोवडीच वळली. त्या ढिगाऱ्यांमधून एक निर्जीव पाय दिसत होता. टुणदिशी उडी मारत उस्मान उद्गारला "माशाल्ला! काहीतरी भानगड दिसतेय्. पुढचे काही वोलायला तो तेथे थांवलाच नाही. ते दोघेही घावऱ्याघुवऱ्या पुढच्या दरवाजाने वाहेर आले. त्यांना कशाचेही भान नव्हते. ते इतक्या गडवडीने वाहेर पडले की वाहेर पडता पडता वाहेरच्या दाराला त्यांचा धक्का लागून लॅच लागल्यामुळे दार आतून तावडतोव वंद झाले. उस्मानच्या कपाळावर घर्मविंदू जमा झाले. आता विचार करत वसण्याची वेळ नव्हती. कपाळावरचा घाम वोटांनी निपटत उस्मान म्हणाला: "मिस्त्री तू इथंच थांव. मी पोलीस चौकीवर जाऊन येतो. मिस्त्री काय उत्तर देतो हे ऐकण्याच्या अगोदरच उस्मानने गावदेवी पोलीस स्टेशनच्या रोखाने धूम ठोकली !

गांवदेवी पोलीस स्टेशनला उस्मान पोचला त्यावेळी सुमारे सव्वासहा वाजले

होते. ड्यूटीवर असलेल्या ऑफीसरची पाळी संपणार होती. रात्रभर पाळी करून थकलेल्या ऑफिसरला सकाळचे दोन तास मोकळे मिळाल्यास ते हवेच असतात. कारण तेवढ्या अवधीत एखादे गंभीर गुन्ह्याचे लफडे येऊन दाखल झाले की त्याची कंबक्ती ! कारण आठ वाजता त्याची पाळी संपली तरी गुन्ह्याचा तपास करणे त्याच्याच बोकांडी बसते. उस्मानची हकीकत ऐकल्यानंतर त्या ऑफिसरने मुकाटयाने फिर्याद लिहून घेतली. गुन्ह्याची नोंद केली. पोलीस ठाण्याचे मुख्याधिकारी इन्स्पेक्टर तंबाकू यांना वर्दी दिली. त्याचप्रमाणे सी. आय्. डी. शाखेलाही त्याने कळविले.

गुन्हा नोंदविण्याचे, उस्मानची जबानी लिहून घेण्याचे व इतर तांत्रिक नोंदी करण्याचे काम पुरे होताच पोलीस उस्मानसह तावडतोब 'टेंपल व्ह्यू' इमारतीकडे निघाले. तेथे ते पोचण्यापूर्वीच फायरब्रिगेडचे लोक येऊन पोचले होते. त्यांनी पुढचा दरवाजा जबरीने उघडून अग्निशमनाचे काम चालविले होते. थोडयाच वेळात सी. आय्. डी. अधिकारीही तेथे येऊन पोहोचले.

श्री. चुनावाला यांच्या घरामध्ये राहाणारी माणसे मुख्यतः दोनच. महंमद सिद्दिक चुनावाला आणि त्यांची पत्नी फातमाबाई. त्यांना अपत्य एकच. ती म्हणजे जहिरा. तिचे लग्न शुजाउद्दिनखान यांच्याशी झाले होते. ते एडन येथे एअर इंडियाच्या ऑफिसमध्ये मॅनेजर म्हणून काम करीत. जहीराला दोन मुलगे होते. थोरला मुलगा शहाजीतखान. एकोणीसशे सदुसष्टच्या ऑगस्ट महिन्यात जहिरा आपल्या मुलांसहित माहेरी आली होती. परत जातेवेळी तिने थोरल्या मुलास आजोबा आजींकडे ठेवले होते. तेव्हापासून दहा वर्षांचा शहाजीतखान मुंबईतच आपल्या आजोबा आजींकडे रहात होता.

'टेंपल व्ह्यू' ही इमारत ओव्हेंडन् रोड आणि ह्यू जेस् रोड यांच्या नाक्यावर आहे. इमारतीचे प्रवेशद्वार किंचित् पश्चिमेला आहे. तळमजल्यावर दोन फ्लॅटस् आहेत. इमारतीच्या प्रवेशद्वाराने चारपांच पायऱ्या चढून वर आले की, डाव्या हाताला चुनावालांच्या फ्लॅटचे प्रवेशद्वार लागते. उजव्या बाजूला शेजारच्या फ्लॅटचे प्रवेशद्वार लागते. समोरच्या बाजस फ्लॅटच्या स्वयंपाकघरात शिरण्याची दारे लागून लागून आहेत. म्हणजे स्वयंपाकघरातून कोणालाही बाहेरच्या ओसरीवर परस्पर येता येत असे. चुनावालांच्या प्रवेशद्वारावर घंटीचे जे बटण होते ते स्वयंपाकघरातील घंटीला जोडलेले होते. या प्रवेशद्वारातून आत शिरताच एक लांबलचक ओसरी ( Passage ) लागते. ओसरीच्या उजव्या बाजूस असलेल्या भिंतीपाठीमागे एक मोठा दिवाणखाना आहे. या भिंतीच्या उत्तर-दक्षिण टोकांना एक एक दरवाजे आहेत. या दिवाणखान्याच्या मधोमध एक पडदा टाकून

दिवाणखान्याचे दोन भाग केले होते. उत्तरेकडच्या भागात जेवणाचे टेबल ठेवले होते व या भागाचा भोजनगृह म्हणून उपयोग केला जाई. दक्षिणेकडचा भाग दिवाणखाना म्हणून वापरला जाई. फ्लॅटच्या प्रवेशद्वारातून प्रवेश केल्यानंतर स्वयंपाकाच्या खोलीत एखाद्याला जायचे असले तर त्याला दिवाणखान्याला वळसा घालून शयनगृहाच्या बाजूनेच पाठीमागे यावे लागते. कारण दिवाणखान्यातून पाठीमागच्या ओसरीत जाण्यासाठी दक्षिण बाजला जे दार होते ते कायमचे बंद ठेवण्यात आले होते. मागील ओसरीतून पाठीमागच्या उघडचा चौकात जाण्यासाठी सुद्धा एक दार होते. परंतु ते कुलूप लावून कायमचे बंद ठेवण्यात आले होते. भोजनगृहात एक रेफ्रिजरेटर होता. जेवण्याच्या टेबलावर एक टेलीफोन व विजेच्या घंटीचे बटण होते. मागच्या ओसरीत मटण ठवण्याची एक काचेची पेटी होती.

पंचनामा सुरू करतेवेळी पोलीसांनी स्वयंपाक घराच्या दारातून प्रवेश केला. स्वयंपाकघराच्या मधोमध जमिनीवर एक अंथरुण होते. त्यावर एक निळसर रंगाची साडी व एक उशी पडली होती. या साडीवर व उशीवर रक्ताचे डाग पडले होते. बाजूलाच एक तपकीरीची जस्ताची डबी पडली होती. या स्वयंपाकघरातून मागील ओसरीवर येताक्षणीच पोलीसांना वर्तमानपत्राच्या रद्दीखाली झाकलेली दोन प्रेते दिसली. एक प्रेत पुरुषाचे होते, दुसरे स्त्रीचे होते. पुरुषाचे प्रेत महंमद सिद्दिक चुनावाला यांचे होते तर दुसरे प्रेत त्यांच्या पत्नीचे म्हणजे फातमाबाईचे होते. महंमद सिद्दिक यांचे डोके त्यांच्या पत्नीच्या वक्षस्थळावर विसावले होते. फातमाबाईचे डोळे उघडेच होते. परंतु दोघांनीही आपापले उजवे हात (आपण झोपताना घेतो तशा पद्धतीने) डोळ्यावर घेतलेले होते. प्राण सोडताना त्यांना आसपास पाहवले सुद्धा नसावे. त्यांच्या अंगावर चाकूच्या वारांच्या अनेक जखमा होत्या आणि अंगावरचे सारे कपडे रक्ताने माखलेले होते. ही प्रेते ओलांडून थोडे पुढे जाताच त्याच ओसरीत किंचित् पुढे एका स्त्रीचे प्रेत होते. ती ॲनी फर्नांडिस होती. ती जमिनीवर पालथी पडली होती. तिच्या अंगावरही अनेक जखमा होत्या व ती रक्ताने न्हाऊन गेली होती. केस अस्ताव्यस्त झाले होते. तिचे दोन्ही हात तिच्या जवळच मरून पडलेल्या कोवळ्या शहाजीतखानाच्या पायजाम्याला चिकटलेले होते. शहाजीतखान—महंमद सिद्दिक यांचा दहा वर्षाचा नातू—हाही पालथ्या स्थितीत पडलेला होता. त्या कोवळ्या पोराच्या अंगावर मोजून तेरा जखमा होत्या. त्याचा गळा चिरलेला होता. पोटाच्या जखमेतून त्याचा कोथळा बाहेर आला होता. ते भयानक दृश्य पाहून खाकी आणि निळ्या गणवेशधारी माणसांनाही चक्कर आल्यासारखे झाल्याशिवाय राहिले नाही ! एकाच दमात चार निर्घृण हत्या. त्या तीन प्रौढांच्या हत्येला काही कारण असो वा नसो. पण त्या चिमुरड्या पोराने असे काय पाप केले होते ?

शहाजीतखान आणि ॲनी यांची प्रेतेदेखील वर्तमानपत्राच्या रद्दीखाली आणि कपड्यांखाली झाकलेली होती. नुकतेच पाणी मारून झाल्याने रद्दी आणि कपडे भिजलेले होते. त्यावर रक्ताचे डाग पडलेले होते. काही रद्दी व काही कपडे अर्धवट जळलेल्या स्थितीत होते. लागलेल्या आगीमुळे ॲनीचे पाय भाजले गेले होते. त्यांच्या प्रेतावर पडलेले बहुतेक सर्व कपडे महंमद सिद्दिक यांचेच होते. कारण त्यावर M. S. C. अशी आद्याक्षरे लिहिलेली होती. शहाजीतखानाच्या प्रेताजवळच वर उल्लेखिलेली मटणाची पेटी होती. ओसरीतून भोजनगृहात प्रवेश करताना पोलीसांना भोजनगृहाच्या पूर्वेच्या दारापासून पश्चिमेच्या दारापर्यंत रक्ताचे डाग विखुरलेले दिसले. तसेच डाग त्या पश्चिमेच्या दाराबाहेर पुढच्या ओसरीतून प्रवेशद्वारापर्यंतही पसरलेले आढळले. तसेच या प्रवेशद्वाराच्या आतल्या बाजूस दाराच्या कवाडावर रक्त पुसल्याचे डाग दिसून येत होते. हे महाभयंकर क्रूर कर्म करून हल्लेखोराने या मार्गाने पलायन केले असल्याचा तर्क यावरून संभवत होता.

भोजनगृहात फारशी गडबड झालेली दिसून येत नव्हती. भोजनगृहाच्या भागात मधोमध जेवणाचे टेबल होते. टेबलावर एक टेलिफोन होता. त्याचा रिसिव्हर काढून ठेवलेला आढळला. जेवणाच्या वेळेव्यतिरिक्त या खोलीचा उपयोग ऑफीसचे कामकाज पाहण्यासाठी केला जाई. रात्रीचे

जयदेव जयदेव, जय गणपतीबाप्पा !



यंदाचा 'जंते'चा गणपती



अमानुष हत्येचा कोवळा बळी शहाजीतखान व आई जहिराबानू

जवण झाल्यानंतरही महंमद सिद्दिक याच टेवलावर आपले कागदपत्र चाळत वसत असत. भोजनगृहात एक रेफ्रिजरेटर होता. त्याचे दार किंचित् उघडले होते. रेफ्रिजरेटरच्या वरच्या वाजूस एका थाळीत दोन संत्री ठवलेली होती. त्याच्या वाजूलाच फळे कापण्याची एक स्टेनलेस स्टीलची सुरी होती.

भोजनगृहातून शयनगृहात प्रवेश करण्यासाठी उत्तरेकडच्या वाजूस एक दार आत होते. तेथून प्रवेश करताच त्या शयनगृहात बऱ्याच वस्तूंची उलथापालथ केल्याचे दिसून आले. मध्यभागी एक जोडपलंग होता. थोड्याच अंतरावर एक छोटेखानी पलंग होता. तो शहाजीतखानाचा होता. जोडपलंगावर पुष्कळशा पेट्या, सूटकेसेस, दागिन्यांच्या पेट्या अस्ताव्यस्त पडलेल्या होत्या. या खोलीत तीन लोखंडी आलमाऱ्या आणि दोन लाकडी कपाटे होती. एक ड्रेसिंग टेवलपण होते. सर्व कपाटांची दारे आणि ड्रेसिंग टवलाचे खण उघडलेले होते. त्यातील वस्तू उचकटल्याचे स्पष्ट दिसत होते. या खोलीतही एका टेवलावर फोन होता. त्याचाही रिसिव्हर खाली काढन ठेवला होता. या खोलीच्या डाव्या वाजूस आणखीन् एक शयनगृह होते. तेथेही एक जोडपलंग होता. ही खोली वहुधा पाहुण्यांसाठी असावी. चुनावालांची मुलगी जहिरा व तिचे यजमान घरी येत त्यावेळी ही खोली त्यांच्या वापरात असायची. या खोलीतील सामानाला हात लावल्याच्या खुणा दिसून येत नव्हत्या. या खोलीतून वाहेरच्या ओसरीवर येण्यासाठी दार होते.

पोलीसांनी नंतर पुनः एकदा चुनावालांच्या शयनगृहाचे सूक्ष्म निरीक्षण केले. चुनावालांच्या पलंगाखाली एक पांढरा शर्ट गुंडाळून ठेवलेला आढळला. तो ओलसर होता. नुकताच कुणीतरी धुवून ठेवलेला होता. तो उलगडून पाहताच त्यावर ठिकठिकाणी रक्ताचे अस्पष्ट शितोडे उडाल्याचे दिसून येत होते. धुतल्यामुळे ते अस्पष्ट झाले असावेत. शर्टच्या कॉलरीचा मानेजवळचा भाग कापलेला दिसून येत होता. मानेजवळ असणारी धोव्याची खूण किंवा शिप्याचे लेवल नष्ट करण्याचा प्रयत्न करण्यात आला होता हे उघड होते. तरीही धोव्याची खूण A1Z व एक △ (त्रिकोण) त्या फाडलेल्या अवस्थेतही दिसत होता. पोलीसांचे हे निरीक्षण चालू असतानाच पोलिसांचे श्वानपथकही तेथे येऊन ठेपले. 'राजा' व 'अकवर' या दोन्ही कुत्र्यांना आत आणण्यात आले. या शर्टावरील कुत्र्यांना धोव्याच्या खुणा, त्या घरात पडलेल्या इतर कपडचांच्या खुणांपेक्षा वेगळ्या असल्याने हा शर्ट परक्या माणसाचा, म्हणजेच कदाचित् गुन्हेगाराचा असण्याची शक्यता होती. म्हणून त्या दोन्ही कुत्र्यांना या शर्टाचा वास हुंगण्यास दिला गेला. शर्ट हुंगल्यानंतर ते दोन्ही कुत्रे ग्रँटरोड स्टेशनच्या रोखाने पळत सुटले. आता ही कुत्र्यांची दुक्कल गुन्हेगारांना खास पकडून देणार अशी आशा पोलीस अधिकाऱ्यांच्या मनात पालवली; पण हे कुत्रे ग्रँटरोड स्टेशनच्या फलाटावर घोटाळत राहिले. मनात पालवलेले अंकुर क्षणातच खुडले गेले. श्वानपथकांचा काही उपयोग झाला नाही. श्वानपथकांच्या पाठोपाठ वोटांच्या ठशांचे तज्ज्ञ श्री. दारुवालाही तेथे येऊन पोहोचले. गुन्हेगारांच्या हाताच्या वा वोटांच्या मुद्रा कोठे आढळतात की काय ते पाहण्यासाठी त्यांनीही घराचे सूक्ष्म निरीक्षण केले. त्यांच्या प्रयत्नांना थोडेफार यशही आले. मागच्या ओसरीतील मटणपेटीच्या काचेच्या झाकणावर चार ठसे आढळले. भोजनगृहातील रेफ्रिजरेटरच्या दारावर आणि वाजूवर काही वोटांचे आणि हाताच्या पंजाचे ठसे आढळले. त्यावर रासायनिक प्रक्रिया करून त्यांचे फोटो घेण्यात आले. त्याचप्रमाणे घरातील सर्व दृश्यांचे व प्रेतांचे फोटो घेण्यात आले. जमिनीवर व इतरत्र सांडलेल्या रक्ताच्या डागांची खरवड नमुन्यासाठी काढून घेत असताना भोजनगृहातील डायनिंग वॅगनखाली एक पांढऱ्या रंगाचा ओलसर तुकडा आढळला. त्यावर **A-1 SBH** अशी धोवीखूण होती. मटणपेटीच्या खाली एक स्टेनलेसचा सुरा सापडला. त्याचे पाते रक्ताने माखलेले आढळले. न्हाणीघरात सर्वत्र लालीलाल झाले होते. न्हाणीघरात काचाच्या पेटीतील असंख्य जळक्या काड्या विखुरलेल्या दिसल्या. तेथेही एक गंजीफ्रॉक भिजलेल्या स्थितीत पडलेला होता. त्यावरही रक्ताचे शितोडे होतेच. त्याच्या मानेकडील भाग कापून टाकलेला होता. पंचनामा करतेवेळी चुनावालांचे आप्तेष्टही येऊन हजर झाले होते. त्यांच्यापैकी एकाने ह्या सर्व प्रेतांची ओळख पटवली. सर्व वस्तूंची मोजदाद करून त्या ताव्यात घेऊन पंचनामा

पुरा करण्यास दुपारचा एक वाजला.

ती चारही प्रेते शवचिकित्सेसाठी पोलीस सर्जनांच्याकडे पाठविण्यात आली. घराला सील लावून पोलीस आपल्या कार्यालयाकडे परतले. मुंबईतल्या सुखवस्तू भागात एकाच वेळी चार खून होणे आणि घरातील चीजवस्तू पळविली जाणे हा प्रकार मुंबई शहरात बऱ्याच दिवसांनी घडला होता. मुंबई पोलीसांच्या अन्वेषणवृत्तीला आणि कर्तबगारीला ते मोठेच आव्हान होते. मुंबई पोलीसांच्या सी. आय. डी. शाखेचे प्रमुख श्री. सामी हे दाक्षिणात्य होते. एक कर्तबगार अधिकारी म्हणून त्यांचा लौकिक होता. साध्या फौजदारपदापासून डेप्युटी कमिशनरच्या पदापर्यंत ते आपल्या कर्तबगारीने चढले होते. वेळोवेळी त्यांना पोलीस मेडल्स मिळून त्यांच्या कर्तृत्वाचा गुणगौरव झाला होता. त्यांचा, आपल्या हाताखालील इन्स्पेक्टर वाकाटकर, मोकाशी, सबइन्स्पेक्टर दुधाट आणि हुषार अधिकाऱ्यांच्या कर्तृत्वावर विश्वास होता. तरीही ते चिंतातुर होते. खुनी इसम शक्यतो लौकर सापडायला हवा असतो. नाहीतर पुराव्याच्या खुणा व अन्वेषणातील दुवे हळुहळू नष्ट होण्याची भीती असते. त्यांनी मनातल्या मनात तिरुपतीच्या व्यंकटरमणाचा धावा चालवला. इतकेच नव्हे तर गुन्हेगार सापडला तर तुझी तात्काळ पूजा बांधीन असा नवसही ते बोलून गेले. मानवी प्रयत्नांची मर्यादा ते जाणून होते. या प्रयत्नांना परमेश्वराचेही पाठबळ पाहिजे हे त्या खाकी गणवेशाखाली झाकलेल्या अंतःकरणास भावत असले पाहिजे.

कार्यालयात आल्यानंतर पोलीस अधिकाऱ्यांनी पुनः एकदा त्या पंचनाम्याचा खल केला. त्या घरात हाताच्या पंजाचे आणि बोटांचे ठसे मिळाले ही एक समाधानाची बाब होती. परंतु तेवढ्याने भागणार नव्हते. गुन्हेगाराला तावडतोब पकडण्यासाठी त्या ठशांचा तात्कालिक उपयोग नव्हता. निर्ढावलेल्या व नोंद झालेल्या गुन्हेगारांचे ठसे पोलीसांकडे असतात. त्यांच्याशी मिळालेल्या ठशांची तुलना करून पुष्कळदा गुन्हेगार कोण असावा हे कित्येकदा आढळून येते; नाही असे नाही. पण तो गुन्हेगार नोंदला गेला नसला तर? आणि या घरातील इतर माणसांचा वावर लक्षात घेता हे ठसे त्या वावरणाऱ्या माणसांच्यापैकी नव्हते याचीही संशयनिवृत्ती व्हायला हवी. तेव्हा संशयितास तावडतोब पकडण्यासाठी या ठशांचा उपयोग नव्हता. पण अशावेळी पुराव्याच्या कामी या ठशांचा उपयोग होतो. पकडलेल्या संशयिताचे ठसे आणि जागेवर आढळलेले ठसे एकमेकांशी जुळले तर पुराव्यातील तो एक भक्कम आधार होतो.

पंचनाम्यात नमूद केलेल्या वस्तूंचे चिंतन करता करता इन्स्पेक्टर वाकाटकरांना त्या ओल्या शर्टाचे व भोजनगृहात सापडलेल्या कापडाच्या तुकड्याचे अतिशय कुतूहल वाटले. त्यांनी तावडतोब त्या कापडांवरील धोब्याच्या खुणा एका कागदावर टिपून घेतल्या. बृहन्मुंबईतील साऱ्या लॉंड्रीचांना भेटी देऊन त्यांच्या खुणांची यादी करण्याचे त्यांनी ठरविले. त्यासाठी त्यांनी लागलीच एका अधिकाऱ्यास या कामी पिटाळले. ॲनी फर्नांडीस आणि शहाजीतखान यांच्या प्रेतावर अर्धवट जळालेल्या कपड्यांमध्ये एक ऑलिव्ह ग्रीन रंगाची पँट होती. हा कपडाही फार महत्त्वाचा आहे, असे वाकाटकरांच्या मनात येऊन गेले.

पुष्कळ वेळा मानवी साक्षीदारांपेक्षा निर्जीव वस्तूच अधिक बोलक्या असतात. अशा निर्जीव वस्तूंच्या ओताने आणि साक्षीदारांच्या जबानीच्या प्रोताने गुन्ह्याच्या अन्वेषणाचे वस्त्र विणता येते. वेगवेगळ्या आणि वरवर असंबद्ध वाटणाऱ्या घटना सूत्ररूपाने जुळवाव्या लागतात. ते जुळविताना गुन्ह्याचा तपास करणाऱ्या माणसाकडे तर्कशुद्ध बुद्धि आणि प्रतिभेचा आविष्कार अपेक्षित असतो. चुनावालांच्या घरी घडलेल्या प्रकारात प्रथम महत्त्वाचा साक्षीदार हा त्यांचा मिस्त्री आचारी होता. उस्मानखान दुधाच्या बाटल्या घेऊन येण्यापूर्वी तो बाहेरच्या ओसरीवर सचिंत मुद्रेने उभा असल्याचे उस्मानखानाने आपल्या पहिल्या खबरीत म्हटले होते. मिस्त्रीने घरातून धूर येत असलेला पाहिलेला होता. मग एवढे पाहूनही तो तेथेच स्वस्थ कां उभा होता? या गुन्ह्यामध्ये त्याचा हात नसेल कशावरून? मिस्त्रीची जबानी घेण्यात आली होती. परंतु अद्याप तो साक्षीदार आहे की गुन्हेगार आहे याबद्दल संशयनिवृत्ती होत नव्हती. त्याने आपल्या

लोकशाही कॅबेरे !




कॅबेरे, कॅबेरे, माझे मत घे रे !

जबानीत पुष्कळच महत्त्वाची माहिती दिली होती.

बावीस ऑक्टोबरच्या संध्याकाळी चुनावाला पतिपत्नी आपल्या नातवाला घेऊन रेडियोक्लबवर गेली होती. त्यावेळी रेहमाबाई नावाची त्यांची एक नातेवाईकही बरोबर होती. ॲनी देखील त्यांच्याबरोबर गेली होती. रेडिओक्लबवरून घरातील मंडळी सुमारे नऊ वाजता परतली होती. त्यानंतर जेवणे वगरे आटोपून नित्याप्रमाणे दहा साडेदहा वाजले होते. याचाच अर्थ या चौघांचाही खून रविवार दि. २२ ऑक्टोबरच्या रात्री साडेदहानंतर झाला होता हे उघड होते. रात्री दहा वाजता झाकपाक करून मिस्त्री आचारी बाहेर आला. तो नेहमीप्रमाणे लागलीच झोपला नाही. गोवालिया मैदानावर कसलीशी जत्रा भरलेली होती. ती पाहायला म्हणून तो बाहेर सटकला. जत्रा पाहून रात्री बारा साडेबाराला परतला. घरातले दिवे अर्थातच त्यावेळी मालवलेलेच होते. घराचे दरवाजे बंद होते. सर्वत्र सामसूम होती. त्याने आपले अंथरूण ओसरीवर पसरले आणि आळसावलेले त्याचे शरीर निद्रच्या आधीन झाले.

सोमवारी सकाळी साडेपाचच्या सुमारास पारशी डेअरीच्या भय्याने त्याला उठवले. तो सहसा त्याला जागे करीत नसे. कारण दरवाज्यावरील बटण दाबले की स्वयंपाकघराचे दार उघडून ॲनी बाहेर येई आणि भय्याने आणलेला रतीब ओतून घेई. भय्याने त्याला जागे केल्यानंतर तो डोळे चोळीत चोळीत उठला. दारावरची घंटी वाजवली तरी ॲनी दार उघडत नाही असे भय्याने सांगितल्यावरून त्यानेही दोनदा घंटी वाजवून बघितली. शेवटी कंटाळून त्याने शेजारच्या फ्लॅटमधील पारशीण वाडियाबाई हिच्या मोलकरणीस उठवले. तिच्याकडून एक भांडे घेऊन त्याने दूध ओतून घेतले आणि भांडे तिच्याच ताब्यांत देऊन त्याने भय्याला वाटेला लावले. पुनः तो निद्रेच्या आधीन झाला. त्याला गाढ झोप लागते न लागते तोच त्याला पुनः कुणीतरी डोसले. त्याने डोळे उघडून बघितले. पहिल्या माळ्यावरच्या शिरीनबाईचा आचारी मगन त्याला उठवीत होता. "मिस्त्री उठ. तुझ्या मालकाच्या घरातून धूर निघतो आहे."

मिस्त्रीने इमारतीच्या बाहेर येऊन रस्त्यावरून पाहिले, तो खिडक्या दारांच्या फटीतून धूर बाहेर पडत होता. तो भयग्रस्त मनाने पुनः इमारतीच्या प्रवेशद्वारापाशी आला. आता काय करावे या विचारात असतानाच उस्मान तेथे आला. त्यानंतर काय घडले ते पूर्वी सांगितलेच आहे.

'टेंपल व्ह्यू' इमारतीत राहणाऱ्या इतर भाडेकरूंच्याही जबान्या घेण्यात आल्या. त्यातून फारसे काही निष्पन्न होत नव्हते. तरीही श्री. ओधवजी शहा आणि श्री. विनायक दळवी यांच्या जबान्यांतून एक महत्त्वाचा मुद्दा निघत होता. ओधवजी शहा हे मुंबई हायकोर्टाचे ॲटर्नी होते. ते नित्याप्रमाणे रात्रीच्या जेवणानंतर कामाचे कागदपत्र वाचत बसले होते. रात्री अकरा ते सव्वा अकराच्या दरम्यान त्यांना कोठून तरी आर्त किंकाळी ऐकू आली. त्यापाठोपाठ त्यांना दुसरीही किंकाळी ऐकू आली. कसली गडबड आहे ते बघून येण्यास त्यांनी आपल्या नोकरास सांगितले. नोकर रस्त्यावर जाऊन आला. तेथे सर्वत्र शांत होते. इमारतीतही सामसूम होते. त्या दोन किंकाळ्यानंतर सर्वत्र सामसूमच झाले होते. नोकराने 'काही नाही' असे सांगितल्यानंतर शहांनी देखील त्याकडे लक्ष दिले नाही. आपले काम आटोपताच ते झोपी गेले. श्री. शहा जसे दुसऱ्या माळ्यावर राहात तसेच श्री. विनायक दळवी हेही दुसऱ्या माळ्यावर राहात. त्यांनीही त्याच सुमारास शहा यांच्याप्रमाणेच किंकाळ्यांचा आवाज ऐकला होता. त्या दोन किंकाळ्यांपैकी एक किंकाळी निश्चितपणे स्त्रीची होती याबद्दल दोघांचे एकमत होते. दळवी हे रिटायर्ड पोस्टमास्तर जनरल होते. रविवारी रात्री रेडियो ऐकून अकरा वाजता त्यांनी रेडियो बंद केला. झोपण्यापूर्वी ते बाथरुममध्ये गेले. तेथून परत येत असताना त्यांना किंकाळ्यांचा आवाज ऐकू आला. तो आवाज खाली चुनावालांच्या फ्लॅटमधून आला याबद्दल त्यांची खात्री होती. त्यांनी खिडकीतून वाकून पाहिले. त्यांना खाली काहीच आढळले नाही. 'काही तरी असेल झालं' असा विचार करीत ते बिछान्यावर येऊन पडले.

येथवरच्या सर्व साक्षीदारांच्या जबान्यांतून आणि प्रत्यक्ष पाहिलेल्या परिस्थितीवरून गुन्ह्याची वेळ आणि गुन्ह्याचा उद्देश याबद्दल निश्चित तर्क बांधता येत होते. ते म्हणजेः गुन्हा रात्री १०॥ ते ११॥-च्या दरम्यान झाला असला पाहिजे आणि चुनावालांच्या घरच्या मूल्यवान वस्तू लुटून नेणे हा गुन्ह्याचा उद्देश असला पाहिजे. आणखी एकदोन निष्कर्षही सहज निघत होते. एक म्हणजे गुन्हेगार हा घरातला माहितगार असला पाहिजे व दुसरा म्हणजे या चार हत्या एकाच माणसांच्या हातून झाल्या नसाव्यात. त्यास अन्य कोणाची तरी साथ असली पाहिजे. गुन्हेगाराने स्वयंपाक घरातून प्रवेश केला असावा. ॲनीने दार उघडताच तिच्याशी झटापट झाली असावी. कारण ॲनीच्या अंथरुणावर थोडे रक्ताचे डाग पडले होते. ही झटापट तेथेच न थांबता मागच्या ओसरीतही चालली असली पाहिजे. तिची आरडाओरड ऐकून महंमद सिद्दिक आणि फातमाबाई ही दोघे जागी होऊन मागच्या ओसरीवर आली असली पाहिजेत. त्यावेळी त्यांना मारण्यात आले असावे. त्यांना झोपलेल्या अवस्थेत मारलेले नव्हते हे उघड होते. कारण त्यांच्या पलंगावर रक्ताचे कसलेच डाग नव्हते. मालक – मालकिणींना ठार केल्यानंतर ॲनी फर्नांडीसचा निकाल लावला गेला असण्याची शक्यता होती. कारण तिच्या अंगावर मोजून पंधरा जखमा होत्या. आपल्या खुनी कृत्याला कोणीही साक्षीदार नसावा हीच भावना तिच्या हत्येपाठीमागे असावी. त्याचप्रमाणे शहाजीतखान या कोवळ्या मुलाच्या हत्येचेही तेच कारण असू शकले असते. ते पोरही गडबडीमुळे जाग होऊन आले असण्याचा संभव होता. कदाचित् त्या गुन्हेगाराचा हात त्याच्यावर सुरी चालविताना निश्चितपणे थरथरला असेल. पण हादेखील साक्षीदार आपल्या गळ्याला दोराचा फास आवळण्यास पुरेसा होईल. म्हणून त्याचा अगदी प्राण गेल्याची खात्री होईपर्यंत त्याला भोसकले असावे. त्याच्या गळ्याभोवती आरपार सुरी फिरवली होती. पोटातून कोथळा बाहेर काढण्यात आला होता. ही सर्व विचारांची सुसंगती अर्थात् तर्कावर आधारता येत होती. चुनावालांच्या घरातील भिंतींना कदाचित् तोंड असते तर त्याच याबेगळ्या अतर्क्य गोष्टी सांगू शकल्या असत्या !

**[ पूर्वार्ध ]**







अनुक्रमणिका

# भारतात पहिल्यानेच!
# नव्या भिंतींसाठी नवा पेण्ट —
# डेकोप्लास्ट

नव्या प्लॅस्टरवरही प्रायमरशिवाय लावता येतो.
उन्हापावसात वर्षानुवर्षे टिकून राहतो.




**सिमेंट पेण्टशी तुलना केल्यास :**

- मजुरीचा खर्च ४०% कमी!
- रंगकामाच्या ७ क्रियांऐवजी दोनच पुरेत!
- पाचपट जास्त भाग रंगविता येतो!

डेकोप्लास्ट बेस व्हाइटमध्ये मॅजिकटच मिसळून ४० मनपसंत रंगछटा झटपट तयार करता येतात. शिवाय ५ पक्के, गर्द रंग तयारच मिळतात.

**जीवनातील रंगसंगती म्हणजेच एशियन पेण्टस्**

AIYARS-A-70 MAR










# सुप्रिया

सुप्रिया ही सुंदर तरुणी मॉडेलिंगच्या व्यवसायात असतानाच एका सामान्य शोफरवर भाळली. आईचा विरोध असूनही तिने त्याची संगत सोडली नाही. एकदा त्याने आपल्या मालकाचा बंगला दाखविण्यासाठी सुप्रियाला नेले आणि त्याच्या बंगल्याच्या आवारातील त्याच्या खोलीत त्याने तिला—तिच्या संमतीनेच—भ्रष्ट केले. घरी आल्यावर आईने या प्रकाराबद्दल तिला बडवून काढले, पण शोफरवरील प्रेम सोडण्यास ती तयार नव्हती. सुप्रियासारख्या शरीरसौष्ठवयुक्त सुंदर तरुणीने आपल्या सौंदर्यावर पैसा मिळविण्याचे सोडून शोफरशी लग्न करण्याचा भिकारडा हट्ट धरावा याचे तिची मैत्रिण मुमताज हिलाही दुःख वाटे. मुमताजने एकदा डाव रचून तिला पिकनिकसाठी लोणावळ्याला नेले आणि त्या पार्टीतील एका मित्राच्या दिमतीला तिला दिले. तिने पुष्कळ विरोध केला, पण तिचे काहीच चालले नाही. मुमताजच्या मित्राची भोगेच्छा पूर्ण करणे तिला भागच पडले. त्याबद्दल तिला भरपूर पैसे मिळाले आणि त्यामुळे मात्र तिला थोडे बरे वाटले. तिने वेश्या-व्यवसाय सुरू केला का ? तेच पुढील प्रकरणांमधून वाचा....



[६]

दुसऱ्या दिवशी मी सकाळीच उठून माझ्या नियमित कामास लागले. मुमताजला सकाळी भेटल्यावर तिने आदल्या दिवशीच्या घटनेचा उल्लेख केला नाही. आता राजेशला काय सांगायचं याचा मी विचार करू लागले. माझा काही दोष नसताना राजेशला मला खोटं सांगावं लागणार होतं. आणि त्याचंच मला वाईट वाटणार होतं आता हे कसं जमणार याचा मला पेच पडला होता.

राजेशला भेटताच मला रडू कोसळलं. त्याच्यापासून सारं लपवून ठेवणं मला अवघड झालं. राजेशऐवजी दुसरा कुणी असता तर मी त्याला सांगून टाकलं असतं; पण राजेशला सांगणं धोक्याचं होतं. माझी चुळबुळ राजेशच्या लक्षात आली. आणि त्याने मला कारण विचारलं.

त्याला सारं सांगावं, त्याने लाथ मारली, गाडीबाहेर ढकलून दिलं तरी काही हरकत नाही असा मी विचार केला. पण सारं सांगायला मला धीर झाला नाही. उलट त्यालाच मी प्रश्न विचारला; माझ्यावर प्रेम आहे का म्हणून !

"काय पण प्रश्न ?" तो म्हणाला.

"नेहमीच तू माझ्यावर प्रेम करशील का ?" माझ्या डोळ्यांतून अश्रू तेवढे यायचे बाकी राहिले होते.

"नेहमीच ग !"

"आपण लवकरच लग्न करायचं ?" मी पुन्हा विचारलं.

तो माझ्या प्रश्नाने संतापला, दुखावला.







"तू माझ्यावर विश्वास ठेवत नाहीस. आपण दिवाळी झाल्याशिवाय लग्न करायचं नाही असं ठरवलं नव्हतं का ?"

"होय."

"घर सजवायला मी तुला पैसे नाही का दिले ?"

"होय."

"मग मी माझ्या वचनाला जागतो समजलं. माझ्याविषयीचा अविश्वास तुझी आई तुच्या मनात भरवते."

"माझ्या आईचा काहीच संबंध नाही. आपण एकत्र राहायचं हे नक्की ना !

"अर्थातच."

"आणि सुखात."

"ते आपल्या दोघांवर अवलंबून आहे."

"खरंच आपण लग्न करायचं ?"

"अरे देवा. तू मला हे किती वेळा विचारणार आहेस ?"

"माफ कर मला राजेश. पण केव्हा केव्हा मला हे अशक्य वाटते." मी रडू लागले. मला रडताना पाहून तो बावचळून गेला. पण त्याचं ते बावचळणं निर्दय होतं हे मला मागाहून समजून आले.

"कशाला रडतेस तू आता ?"

काल घडलेली गोष्ट त्याला सांगू शकत नसल्यामुळे, मन हलकं करण्यासाठी मी रडत होते.

"खरंच मी फार वाईट मुलगी आहे."

"सुप्रिया असं मी तुला म्हटलं नाही." त्याने मला कुरवाळलं.

राजेशचा मालक काही दिवसासाठी बाहेर जाणार असल्याचं मला त्याने सांगितलं. मला आनंद वाटला. कारण राजेशबरोबर शय्यासोबत करायला मिळणार होती. पण तो मोह मी टाळायचं ठरवलं.

"राजेश तुझ्या मालकाच्या बंगल्यावर येणं मला शक्य नाही."

"कां ?"

"कां ते मला विचारू नकोस."

"बरं मग उद्या तरी." तो निःश्वास सोडत म्हणाला.

"आज नाही, उद्या नाही, केव्हाच नाही."

केव्हाच नाही ? याचा अर्थ ? त्याने आश्चर्याने विचारले. "तुला झालंय तरी काय ?"

त्याच्या चेहऱ्यावर कसल्यातरी शंका उमटल्या होत्या.

"राजेश मी तुझ्यावर प्रेम करते. मग आपलं लग्न होईपर्यंत पुन्हा असलं काही करायचं नाही असं मी ठरवलं आहे." मी म्हणाले.

"मी लग्नाला नकार देईन म्हणून तू भितेस ?

लेखक व छायाचित्रकार
## पुरुषोत्तम बावकर

"नाही. माझी खात्री आहे. तू माझ्याशी लग्न करणार म्हणून ! आणि तसा विश्वास वाटला नसता तर मी अशी तुझ्याबरोबर फिरले नसते."

तो रागाने लाल झाला होता. "पण मग तू असं कां ठरवावंस ?"

"ते मी तुला सांगणार नाही."

त्याला ते आवडले नाही. त्यावेळची त्याची वागणूक थोडी तुसडेपणाची होती. पण त्यानंतर माझ्याशी त्याने वाईट वर्तन केले नाही. नेहमीप्रमाणे आम्ही भेटत होतो आणि चुंबनापलिकडे आम्ही गेलो नाही.

पण जेव्हा जेव्हा मी त्याच्याशी लग्नाचा विषय काढी तेव्हा तेव्हा तो बोलायचा बंद होई. टाळायचा प्रयत्न करी. काही दिवसांनी त्याने, घरगुती अडचणीमुळे, लग्न उन्हाळ्यापर्यंत पुढे ढकलायचं ठरवलं. मला फार वाईट वाटलं.

माझं लग्न पुढं ढकलल्याचं ऐकून आईला विशेष काही वाटलं नाही. ती काहीच बोलली नाही. एके दिवशी रात्री जेवत असताना मी तो विषय काढला त्यावेळी आई म्हणाली,

"जी लग्नाची वाट पाहते आणि जिचं लग्न होत नाही, अशा तुझ्यासारख्या मुलीला सामानाच्या फळीवरची मुलगी म्हणतात. राजेश तुला उष्टावून ठेवत आहे. आणि उष्टावलेली वस्तू खराब होते. फेकून द्यावी लागते."

मी रागावले. "लग्न पुढं ढकलण्याची पहिलीच वेळ आहे. पण तो शोफर आहे, म्हणून तू रागावली आहेस."

"मी कुणावरही रागावलेली नाही."

"नाही कशी ? तुला आमच्या खोलीवर पैसे खर्च करावे लागणार आहेत. पण तू काळजी करू नकोस."

"माझ्या लाडक्या मुली; प्रेमाने तू आंधळी झाली आहेस. तुझं डोकं भणभणलं आहे."

"काही हरकत नाही. माझ्यावर तू जितके पैसे खर्च केले आहेस, तितके तो सारे देईल. त्याने हे पैसे दिलेत." रामने मला दिलेल्या नोटा मी तिला दाखवल्या. मी खोटं बोलले होते.

मी आईला नाही नाही ते बोलले. तिची पक्की खात्री झाली होती. राजेशने ते पैसे दिले नव्हते. ती शांतपणे मांडी विसळू लागली.

"आई मला क्षमा कर. मी तुला नाही नाही ते बोलले. तू जेव्हा राजेशबद्दल बोलतेस तेव्हा माझा तोल जातो."

"मला तू त्रास देऊ नकोस."

"आई खरंच सांगते, राजेशने माझ्याशी लग्न केलं नाही तर मी जीव तरी देईन किंवा निघून जाईन."

माझं लग्न पुढे ढकलल्याचं ऐकून मुमताजला बरं वाटलं. "त्याला तुझ्याशी केव्हाच लग्न करायचं नाही." ती म्हणाली. मला फार वाईट वाटलं. मी तिला काहीतरी वाईटसाईट बोलले असते. पण त्यामुळे तिची माझी मैत्री तुटली असती. अन् मला तिचं दुःख माहीत होते. फिरोज तिच्याशी केव्हाच लग्न करणार नव्हता.

"तू राम म्हात्रेला केव्हा भेटणार ?" मुमताजने विचारले.

"त्याचं नाव नको काढूस."





अनुक्रमणिका

"आपण पिकनिकला गेलो असताना तो वाईट वागला; पण त्याचं त्याला दुःख होतंय. तो तुझ्यावर कितीही पैसे खर्च करायला तयार आहे."

"मला त्याच्याबरोबर जायचं नाही."

"असं काय करतेस वेडघासारखं. तू सुखी राहावंस अशी माझी इच्छा आहे. तो चांगला माणूस आहे. तो तुझ्यावर प्रेम करतोय. आपण त्याला भेटू."

"मी सांगितलं ना तुला, मला त्याच्याशी कर्तव्य नाही म्हणून !"

"सुप्रिया ग, तुझ्या या वागण्यानं तू पस्तावशील."

"तुला आवडत असलं तर तू जा त्याच्याबरोबर."

ती राम म्हात्रेची बाजू घेऊन माझ्याशी भांडू लागली. मला एक प्रकारच्या भीतीने ग्रासलं. मुमताज आणि आई दोघं कदाचित् बरोबर असतील. माझं लग्न होण्याचा योग नसेल आणि म्हणूनच मी लग्न करायचंच या जिद्दीला पेटले.

मी फर्निचरचे सारे हप्ते फेडले होते आणि जास्त पैसे मिळविण्याच्या हेतूने काम करत होते. सकाळी स्टुडिओत जात असे आणि दुपारी आईबरोबर खोली बंद करून रात्र पडेपर्यंत कपडे शिवत असे. मी शिवत असताना मात्र माझं मन राजेश, लोणावळयाची सहल, आई आणि माझं आयुष्य याचाच सारखा विचार करी. आई कशाचा विचार करी हे कळायला मार्ग नव्हता; पण ती कशाचा तरी विचार करत असे हे नक्की. अशा वेळी मी तिला काही प्रश्न विचारला तर ती माझ्या अंगावर येई. सायंकाळ झाली की मी फिरायला बाहेर पडे. कधी मुमताजला भेटे, तर कधी राजेशला. त्यावेळी मी खरोखरीच सुखी होते की नाही याचा मी आज विचार करतेय; पण तसं पहायला गेलं तर, मी सुखी होते असं म्हणायला हरकत नाही. कारण त्यावेळी मी कोणत्यातरी ध्येयासाठी धडपडत होते.

राम म्हात्रे सारखा माझा पाठलाग करत असल्याचा त्यावेळी मला संशय आला होता. मी सकाळी स्टुडिओला जात असे तेव्हा मी त्याला नियमितपणे माझी वाट पहात असल्याचे पाहिले होते. मी निघाले की तो माझ्या मागं हळुहळू चालत येई. माझ्याकडे भरलेल्या डोळयाने पाही; पण त्याने कधी माझ्याबरोबर बोलण्याचा प्रयत्न केला नाही. मी त्याच्याकडे पाहिलं तर तो लाजेनं मान खाली घाली. अशा वेळी कोणतीही स्त्री, पुरुषाचं आपल्यावर असलेल्या मूळ प्रेमाबद्दल उदासीन राहू शकत नाही. मी त्याच्याशी कधीही न बोलण्याची प्रतिज्ञा केली होती. तरीही त्याच्याबद्दल मला दया वाटे.

एके दिवशी सायंकाळी मी घरी आले, तेव्हा राम आईशी गप्पा मारत असल्याचं मला दिसलं. माझा चेहरा रागाने लाल झाला. मला जिंकण्यासाठी तो आईचं मन वळवत असल्याची खात्री झाली.

"तुझं काय काम आहे इथं ?" मी त्याला विचारलं. त्यानं माझ्याकडे पाहिलं आणि त्याचा चेहरा पडला.

"ह्या माणसाची आणि तुझी ओळख आहे आणि तुझी चौकशी करायला तो आला होता." आई म्हणाली.

रामने आईला पैसे दिले असल्याचा मी कयास केला होता आणि. तो खरा असल्याचं मी जाणलं.

"तू जा बघू आत." मी आईला दाटलं. माझा तो अवतार पाहून आई आत गेली. "तुझं काय काम आहे ? चालता हो इथून." मी रामला म्हणाले. त्यानं माझ्याकडे पाहिलं; तो काहीच बोलला नाही. त्याच्या नजरेत क्षमा याचना होती. "चालता हो." मी जमिनीवर पाय आपटत ओरडले. "नाहीतर मला माझ्या शेजाऱ्याना बोलवावं लागेल."

त्यावेळी त्यानं मला ब्लॅकमेल कां केलं नाही, याचं आश्चर्य वाटतं. मला ब्लॅकमेल करण्याची त्याला उत्तम संधी होती. लोणावळयाला झालेला प्रकार तो राजेशला सांगू शकला असता. कारण त्यावेळी त्यानं माझा उपभोग घेतला होता. आणि ह्या गोष्टीला साक्षीदारही होते. मी ही गोष्ट नाकारू शकले नसते; पण आता मला वाटतं की प्रथम त्याला माझा नुसता उपभोग घ्यायचा होता. आणि नंतर तो माझ्यावर खरोखरीच प्रेम करू लागला.

मी शेजाऱ्याला बोलावण्याचा धाक घातला तेव्हा तो जाऊ लागला. जिन्यावरून खाली उतरताना तो थांबला. त्याला काहीतरी सांगायचं होतं, पण त्याचा धीर गळाला होता. तो माझ्याकडे पहात राहिला. अन् काही वेळाने दरवाजा बंद करून निघून गेला.

मी सैपाकघरात आईकडे गेले.

"त्याला तू काय सांगितलंस ?" मी रागाने आईला विचारले.

"काही नाही" ती म्हणाली. "त्याने काही शर्ट शिवायला दिले आहेत. आणि आम्ही काय करतो म्हणून चौकशी करत होता."

"तो माझ्याबद्दल काही बोलला नाही ?

"तू केव्हा लग्न करणार म्हणून त्याने विचारले."

"मग तू काय सांगितलंस ?"

"तू दिवाळी झाली की लग्न करणार म्हणून म्हणाले."

"त्याने तुला काही पैसे दिले का ?

"नाही. पण कां ?" तिनं घाबरून विचारलं.

तिच्या आवाजावरून, त्याने पैसे दिल्याची खात्री झाली होती.

"मला खरं सांग." मी तिला घुसळली.

"खरंच त्यानं मला काही दिलं नाही." तिचा हात ब्लाऊजमध्ये गेला; पण मी तो तिचा हात खेचला. त्याबरोबर एक नोट खाली पडली.

मी तिचा हात जरी धरला होता, तरी ती खाली वाकली. अन् तिनं ती नोट उचलली. रामने पैसे दिले होते तेव्हाची माझी स्थिती मला आठवली. आईला दोष देण्यात अर्थ नव्हता. कारण तिला पण माझ्यासारखाच मोह आणि इच्छा झाली होती. मी काहीच बोलले नाही. मी तशीच बाहेर गेले.

अनुक्रमणिका

दुसऱ्या दिवशी मी जेव्हा मुमताजला भेटले तेव्हा तिच्याबरोबर फिरोज नव्हता.

"तुला काही सांगायचंय." ती म्हणाली. कसल्यातरी वाईट विचाराने माझा चेहरा काळवंडला.

"जर का ती बातमी वाईट असेल तर मला बाई सांगू नकोस." मी म्हणाले.

"ती चांगली पण नाही अन् वाईट पण नाही. ती फक्त एक बातमी आहे." ती म्हणाली. "राम म्हात्रेबद्दल मी तुला सांगितलंच आहे."

"मला त्याच्याविषयी काहीच ऐकायचं नाही."

"ऐक तर खरं. राम एक मोठा पोलीस अधिकारी आहे."

"तो जरी एखादा मंत्री असला तरी मला त्याच्याशी कर्तव्य नाही."

"तू ऐक तर खरं. त्यानं तुला नुसतं भेटायला बोलावलं आहे. तो काही प्रेमाची याचना करणार नाही. तुझ्याशी ज्याचा महत्त्वाचा संबंध आहे अशी एक बातमी सांगणार आहे."

"माझ्याशी ज्याचा संबंध आहे ?"

"होय. केवळ तुझ्या भल्यासाठी."

"बरं मी जाईन." माझी स्थिती मेल्याहून मेल्यासारखी झाली. माझा पडलेला चेहरा पाहून मुमताज घाबरली.

"असं एकदम काय झालं तुला ? राम पोलिसातला आहे, म्हणून तुला काही घाबरायला नको. तो तुला काही खाणार नाही.

"त्याचं ऑफिस कुठं आहे ?"

"जे. जे. कॉलेजजवळ. क्रॉफर्ड मार्केटसमोर."

त्या दिवशी मी खूप उशिरा झोपले. रामने मला कशाला बोलावले हेच कळेना. त्यानं ज्याअर्थी पोलीस कचेरीत बोलावलं त्याअर्थी काहीतरी पोलीशी कामासंबंधी असणार. आणि एकदा का पोलिसाशी संबंध आला की मग त्यांच्या तावडीतून सुटणं मुष्किल होतं. कदाचित् राजेशला कसल्यातरी भानगडीतून सोडविण्यासाठी त्याला माझं शरीर हवं असणार असं मला वाटलं. माझ्या मनात नाना विचार यऊ लागले. आईची ब्रेड कापायची सुरी घेऊन रामचा खून करावा असंही मला वाटू लागलं. मनात विचारांचे तरंग उठत असतानाच पहाटे कुठं माझा डोळा लागला.

सकाळी उठून नेहमीप्रमाणे मी राजेशला भेटायला गेले. त्याला भेटताच मी पहिला प्रश्न केला,

"तू राजकारणात सरकारविरुद्ध कधी भाग घेतला आहेस का ?"

तो माझ्याकडे पहात राहिला. "तुला काय वाटलं मी मूर्ख आहे ?"

"नाही, पण—"

"पण काय, तुला मी मूर्ख वाटतोय का ते सांग प्रथम."

"नाही तसं काही वाटत नाही."

"मग तुला तसा संशय येण्याचं कारण?

मला काही सांगता येत नाही. पण केव्हा केव्हा—

"ज्यांनी कुणी तुझ्या मनात भरवलं असेल त्यांना सांग राजेश राजकारणाच्या उठाठेवी करण्याइतपत मूर्ख नाही."

सुमारे अकरा वाजता मी रामच्या ऑफिसभोवती चकरा मारीत आत जावं की न जावं याचा विचार करत होते. शेवटी एकदा आत शिरले. रामचं ऑफिस पहिल्या मजल्यावर होतं. त्याचं ते ऑफिस पाहून तो कोणी मोठा अधिकारी आहे हे पटलं. रामच्या खोलीत जेव्हा मी शिरले तेव्हा तो पेपर वाचत होता. त्यानं माझ्याकडे लक्ष दिलं नाही. कामात असल्याचं भासवलं.

मी टेबलावर हात ठेवले आणि म्हटलं, "मी ही इथं आहे." माझा शब्द ऐकताच तो खुर्चीवरून उठला आणि माझ्याकडे आला. त्याने माझे हात हातात घेतले. त्यांचं चुंबन घेतलं. त्याला काहीतरी बोलायचं होतं. त्याचे ओठ हालले पण तो बोलू शकला नाही.

"तू आलीस ?" त्यानं हळुवारपणे विचारलं.

"होय मी आले. खरं म्हटलं तर मला यायचं नव्हतं. तुला काय सांगायचं आहे ते लवकर सांग."

"माझ्या शेजारी बस." तो पुटपुटला. त्याने माझा हात अजूनही हातात धरला होता. मी खाली बसले. तो खाली वाकला. त्याने माझे पाय पकडले. आणि डोके मांडीवर ठेवून घुसळले.

"तुला काही महत्वाचं सांगायचं होतं ना, मग सांग नाहीतर मी जाते."

"तो माझ्या शेजारी बसला आणि त्यानं माझा हात हातात घेतला.

"काही नाही. तुला पुन्हा पाहायचं होतं."

मी उठण्याचा प्रयत्न केला. त्याने माझा हात घट्ट दाबून खाली बसवलं.

"आपल्या दोघांच्या मनामधील संशय दूर झाला पाहिजे. आपली दोघांची मैत्री झाली पाहिजे."

"कोणत्या प्रकारे ?"

"मी तुझ्यावर प्रेम करतोय. माझं तुझ्यावर प्रेम आहे. माझ्यावरोबर तू रहायला ये. माझ्या घराची तू स्वामीनी हो ! माझ्या पत्नीप्रमाणे मी तुला वागवीन. तुझ्यासाठी वाटेल ते आणीन. कपडे, दागिने, तू जे मागशील ते."

"तू मला हे सारं सांगण्यासाठीच का इथं बोलावलंस ?"

"तुला माझ्याशी संबंध ठेवायचा नाही का ?"

"त्याबद्दल मी जरासुद्धा बोलू इच्छित नाही."

माझ्या उत्तरानंतर त्याने एक शब्द उच्चारला नाही. त्यानं माझा हात सोडला आणि माझ्या डोळ्यात तो पाहू लागला. त्याने आपल्या नजरेने मला मोहिनी घातली. त्याने माझा चेहरा आपल्या हातात पकडला. तो त्याला मनात ठसवायचा होता. त्याची बोटे हळुवारपणे माझ्या चेहऱ्यावर ओठावर फिरत होती. प्रेमात पडलेल्या माणसाचं ते वागणं होतं. त्याचं प्रेम इतकं होतं की मी एकवेळ भांबावून गेले. त्याला साथ द्यावी असं मला वाटू लागलं. पण त्यानं मला वेळच दिला नाही. मला गोंजारणं संपताच तो उठला आणि दबलेल्या आवाजात म्हणाला,

"जरा थांब. मला खरंच तुला काही सांगायचं आहे." तो टेबलाकडे गेला. त्याने एक तांबडी फाईल आणली. मला भीती वाटली, "काय आहे ते ?"

तुझ्या प्रियकराबद्दलची काही माहिती आहे." तो अधिकारी आवाजात म्हणाला.

"अरे देवा" मी घाबरून डोळे बंद केले. त्याचं माझ्याकडे लक्ष नव्हतं. तो फाईलची पानं चाळत होता.

"त्याचं नाव राजेश उर्फ राजाराम पारकर असं असून त्याचं लग्न झालं आहे. त्याला दोन मुलं असून त्याची बायको रत्नागिरीला आपल्या माहेरी राहते."

मी काहीच बोलले नाही. मी सरळ बाहेर पडले.

माझी स्वप्नं भंग पावत होती. राजेशबद्दल ती माहिती कळल्यानंतर मला विशेष काही वाटलं नाही. राजेश दुष्ट नव्हता पण प्रेमामुळं त्याने मला फसवलं होतं. राम आणि त्याच्यात काही विशेष फरक नव्हता. दोघांनाही मी हवी होते. दोघांनाही कायद्याने माझ्यावर अधिकार गाजवता आला असता तर, तसं वागायला त्यांनी मागंपुढं पाहिलं नसतं. त्या दोघांना दोष देण्याचं कारण नाही. माझं दैवच वाईट. मी फुकट वळी पडले होते.



गोव्यातही 'मगोराम' व 'युगोराम' यांचे युद्ध चालू आहे !

मी गोंधळून गेले होते. डोके शांत ठेवण्याचा प्रयत्न केला आणि घरी परतले. त्या दुपारी मी नेहमीप्रमाणे, माझ्या कार्यक्रमास सुरुवात केली. मी आईला कशाचाच थांगपत्ता लागू दिला नाही. दुपारी कपडे शिवता शिवता मी उठले आणि माझ्या खोलीत बिछान्यावर जाऊन पडले. मी माझ्या फर्निचरकडे पहात विचार करत असतानाच मला झोप लागली. मला चांगली चार तास झोप लागली. रात्री जेवायच्या वेळी आईनं मला उठवलं.

"मला उठायचं नाही." तोंडावरून पांघरूण घेत मी म्हटलं.मला भूकच नव्हती.

"असं काय करतेस, तुला काही नको का ?"

"मला भूक नाही."

"तुला बरं नाही का ?"

"मला कुठं काय झालंय. मला उद्या सकाळी उठवू नकोस" मी म्हणाले.

"कां ?"

"कारण आता मला मॉडेल म्हणून काम करायचं नाही."

"मग तू काय करणार आहेस ? तुला जेवायला घालायला मला आता शक्ती नाही."

"तू काही काळजी करू नकोस. आता माझ्याकडे भरपूर पैसे असतील यापुढे. तू मात्र मला उगाच त्रास देऊ नकोस."

खूप वेळ शांतपणात गेला.

"तुला काही पाहिजे का ?" तिने पुन्हा विचारलं.

"नको."

नेहमीप्रमाणे दुसऱ्या दिवशी सकाळी मला राजेशला भेटायला जायचं होतं; पण मी ते टाळलं. प्रथम मला त्याचा द्वेष वाटू लागला. पण मला त्याचा द्वेष करायचा नव्हता.

मला त्या दिवशी आळसावल्यासारखं वाटू लागलं. आई सकाळीच कुठं बाहेर गेली होती आणि संध्याकाळपर्यंत येण्याची शक्यता नव्हती. मी बिछान्यावर खूप वेळ पडून राहिले. आता माझ्या नव्या

आयुष्याला सुरुवात झाली होती. अशा रीतीने, बिछान्यावर लोळण्यात मजा असते हे सुख मी पूर्वी केव्हाच अनुभवले नव्हते. आता ते मी अनुभवणार होते. रोज अनुभवणार होते. माझी गरीबी संपुष्टात येणार होती. विषयवासनेचं सुख आणि पैशामुळं मिळणारं सुख ह्याचं महत्त्व मला कळलं होतं आणि यापुढे मी पैसा केव्हाच नाकारणार नव्हते. मग तो कशाही तऱ्हेने मिळो. मी अजूनपर्यंत माझ्या शरीराकडे लक्षपूर्वक केव्हाच पाहिले नव्हते. त्या सकाळी मी ते प्रथम पाहिले.

मी अंथरुणातून तशीच उठले आणि आरशासमोर उभी राहिले. मी आरशात दिसणाऱ्या माझ्या शरीराकडे पाहिले. आरशात निरखून पाहिल्यावर वाटलं, रामशिवाय इतर माणसांकडूनही, माझ्याकडून सुख मिळाल्यास खूप पैसे मिळतील.

मी आळसावलेल्या स्थितीतच कपडे केले. कॉफी प्याले आणि बाहेर पडले. जवळच्याच हॉटेलमधून मी राजेशला फोन केला. माझा फोन घेताच राजेशने विचारले,

"तुला बरे नाही का ?"

"इतकी आनंदी मी केव्हाच नव्हते."

"मग आपण केव्हा भेटायचं ?"

"तुला आवडेल तेव्हा." मी म्हणाले, "तुझ्या मालकाच्या बंगल्यात प्रथम भेटले, तसं भेटायला मला नक्की आवडेल" तो नक्की काय ते समजला.

"ती माणसं दहा दिवसांनी नाताळच्या रजेत बाहेरगावी जाणार आहेत" तो उत्सुकतेने म्हणाला.

"मग ठीक आहे. तुला मी दहा दिवसांनी भेटेन."

"कां ?"

"तोपर्यंत मी बिझी आहे."

"कारण काय ?" त्याने संशयाने विचारले, "माझ्यावर रागावलीस ?"

"नाही. मी तुझ्यावर रागवले असते तर तुझ्या मालकाच्या बंगल्यावर तुला भेटायला बोलावले नसते."

मला वाटलं होतं, तो काहीतरी बोलेल.

"घाबरू नकोस. मी तुझ्यावर पहिल्याइतकंच प्रेम करते. आणि दुसरी गोष्ट म्हणजे मला रात्र होईपर्यंत घरातून बाहेर पडायला वेळ मिळत नाही. आणि तुला तर रात्री वेळ नसतो. म्हणूनच तर तुझा मालक गेल्यावर भेटेन म्हणाले."

"पण सकाळचं काय ?"

"मी झोपलेली असणार." मी म्हणाले. "मी आता काही मॉडेल नाही."

"कां ?"

"मला कंटाळा आलाय. तुला बरं वाटलं असेल ना हे ऐकून. दहा दिवसांनी भेटेन मी तुला. फोन करेन."

"बरं."

"माझ्याबद्दल त्याला संशय आला तरी दहा दिवसापूर्वी तो माझी भेट घेण्याचा प्रयत्न करणार नाही याची मला खात्री होती. मी त्याच्याशी अगदी शांतपणे बोलले होते. मला आमच्या संबंधात बिघाड आणायचा नव्हता.

## [७]

त्या दिवशी दुपारी मी मुमताजच्या खोलीवर गेले. नेहमीप्रमाणे ती नुकतीच

झोपून उठली होती; आणि कपडे करत होती. तिच्या चुरगळलेल्या बिछान्यावर मी बसले आणि रामबरोबरच्या भेटीचा वृत्तांत सांगितला. राजेशचं लग्न झालंय आणि त्याला एक मूल आहे हे सांगताच तिच्या चेहऱ्यावर आश्चर्यमिश्रित आनंद झळकला. तिने माझ्या खांद्यावर हात ठेवले आणि डोळ्यात पाहिलं.

"नाही. मी या गोष्टीवर विश्वास ठेऊ इच्छित नाही. बायको आणि मुलगी ! हे खरं असेल का ?"

"खरंच असणार."

"हे ऐकून तू रागावली असशील, सुप्रिया."

"अर्थातच."

"पण त्याने जेव्हा ती बातमी तुला सांगितली तेव्हा तू काय म्हणालीस ?"

"काय म्हणायचंय ?"

"तू रडली नाहीस ?"

"मला रडायला सुचलंच नाही."

"झालं ते ठीक झालं. आता तू काही राजेशशी लग्न करू शकणार नाहीस. तुझ्यासारखी साधीभोळी मुलगी त्याच्यावर विश्वासली आणि त्याने तुला फसवलं. नाहीतरी सारी पुरुष जातच मुळी बदमाश ! "

"मला हे सारं माहीत आहे याची राजेशला कल्पना नाही."

"मी अजून विश्वासच ठेवू शकत नाही या गोष्टीवर". मुमताज माझ्या गळ्यात गळा घालून म्हणाली. तिने माझी भराभर चुंबनं घेतली.



"तुझ्या आईला माहीत आहे ?"

"नाही. पण त्याने माझ्या आईला उगाचच पैसे खर्चायला लावले."

"पैशाची काही काळजी करू नकोस. राम चांगला माणूस आहे. तू तुझ्या मनाची फक्त तयारी कर. राम वाटेल तेवढे पैसे खर्च करील."

"मला रामशी संबंधच ठेवायचा नाही. दुसरा कुणीही चालेल; पण राम नको. मला एकाच्या बंधनात आता राहायचं नाही."

"माझ्यावर सोपव दुसऱ्या कुणाला भेटायचं ते."

"मला आईचे सारे पैसे परत करायचे आहेत आणि तिला आता माझ्यासाठी काही करायला लागू नये अशी माझी इच्छा आहे."

"तू गोड पोरगी आहेस. तुझ्यासाठी मी चांगलीच माणसं शोधीन ! " ती पावडर तोंडाला लावता लावता म्हणाली.

मी गप्प राहिले. तिनं मला आश्वासन दिलं होतं. त्यात तिचाही स्वार्थ होता; हे मला माहीत होतं.

तिला वेळ झाला होता. तिला कुणालातरी भेटायचं होतं. तिने कपडे केले आणि ती खाली जायला निघाली. "तुला माहीत आहे, राजेशप्रमाणेच, फिरोजने मला फसवायचं ठरवलं होतं ! "

"त्याचं पण लग्न झालंय ?"

"नाही. पण तो फसवायचा प्रयत्न करत आहे हे समजताच मी सांगितलं; माझ्या दोस्ता, तुला माझी साथ हवी असेल तर घे, नाहीतर तू आपला जा कसा ! "

मी यावर काहीच बोलले नाही. तिनं मला दुसऱ्या दिवशी, आमच्या ठरलेल्या, हॉटेलात बोलावलं आणि ती निघून गेली.

झाल्या गोष्टी आईला सांगायला हव्या होत्या. पण ते ऐकून तिला जास्तच दुःख झालं असतं. कारण माझ्यावर तिची खरोखरीची माया होती. मी तिला काहीच सांगितलं नाही.

दुसऱ्या दिवशी आईने जास्त चवकशी करू नये म्हणून, राजेशला भेटायला जाते; म्हणून सांगून, सारा दिवस बाहेर राहिले. लग्नासाठी मी अंजिरी रंगाची एक बंगलोरी साडी घेतली होती. त्याच रंगाचा मॅचिंग ब्लाऊज शिवला होता. तीच साडी नेसायचं मी ठरवलं. नाहीतरी केव्हातरी ती नेसायला हवी होती. आता मला ती साडी किती सामान्य होती याची कल्पना आली की हसू येते. मी केस विंचरले आणि आणि मेकअप् केलं. मी तशीच उठले आणि सिनेमाला गेले. तोच सिनेमा मी दोन वेळा पाहिला. रात्र होताच मी सिनेमा अर्धवट सोडला आणि मुमताजला भेटायला त्या हॉटेलात गेले. मुमताज माझी वाट पहात उभी होती. तिच्या बरोबर मध्यमवयीन टक्कल पडलेला माणूस होता. तो औषधी विक्रेता असावा असे त्याच्या हातातल्या बॅगेवरून वाटले. मुमताजने माझी त्याच्याशी ओळख करून दिली. तो माणूस ठेंगू होता. त्याचा चेहरा बसका होता. तो रंगाने काळा होता. मला जरा लाजल्यासारखं झालं त्याच्याशी बोलताना. मी खाली बसले. तो मुमताजला सांगत होता, "माझ्याविषयी तू कधीच तक्रार करू शकत नाहीस." त्याने आपला हात तिच्या मांडीवर ठेवला. "आपल्या सहा महिन्यांच्या मैत्रीच्या काळात मी तुला असमाधानी करून पाठवल्याचं गळ्यावर हात ठेवून सांग."

"कधीच नाही." मुमताज खाली मान घालत म्हणाली.

"मला बक्षीस देण्याची फार हौस आहे. मी जेव्हा जेव्हा गावाहून परत येतो, तेव्हा तेव्हा काहीना काही बरोबर घेऊन येतो. तुला आठवत असेल मुमताज, मी तुला हॅण्डबॅग आणली होती."

"ती खराब झाली." मुमताज म्हणाली.

"प्रत्येकाने माझे आभार मानावेत अशी माझी इच्छा आहे आणि तसे माझे आभार मानले की मला बरे वाटते. स्त्रियांना प्रेझेण्ट दिलेली फार आवडतात. त्यांना वाटतं ह्या प्रेझेण्टच्या मागं काही भावना आहेत, पण खरं तसं काहीच नसतं."

"तू फारच आतल्या गाठीचा आहेस."

"मी काही आतल्या गाठीचा नाही." आपले पांढरे दात दाखवत तो म्हणाला, "मी फार अनुभवी माणूस आहे इतकं !"

त्याने सिगरेट पेटवली आणि तो उठला, "आता एका क्षणातच येतो."

तो खोलीच्या बाहेर गेला. चालताना तो कितीतरी ठेंगणा वाटत होता.

मुमताजने सिगरेट विझवली आणि म्हणाली, "कंटाळा आला. सारखं आपलंच घोळवत राहतो."

मनमोहन परत आला. त्यानं बिल दिलं आणि आम्ही बाहेर पडलो. रस्त्यावर आल्यावर तो म्हणाला, "ही संध्याकाळ सुप्रियाची. तू येणार आहेस का जेवायला ?"

"नाही" मुमताज म्हणाली. "मी अगोदरच ॲपॉईण्टमेण्ट घेतली आहे." आणि ती निघून गेली.

"किती छान मुलगी आहे." मी उगाचच म्हणाले.

त्यानं चेहरा केला. "वाईट नाही. तिचा बांधा चांगला आहे."

"तुला ती आवडत नाही का ?"

"आवडण्याचा प्रश्न नाही." तो माझा हात हातात घट्ट पकडत म्हणाला."प्रत्येकानं आपलं काम व्यवस्थित करावं अशा मताचा मी आहे. टायपिस्ट चांगली दिसली पाहिजे अशातली गोष्ट नाही. तिला चांगलं टाईप करता आलं पाहिजे—आणि मुमताजसारखी मुलगी नुसती आवडणारी असावी असं माझं मत नाही. तर एकदोन तास जेवढा वेळ ती माझ्या सहवासात असेल तेवढा वेळ तिनं माझं समाधान केलं पाहिजे. खरं सांगायचं म्हणजे, तिचं हल्ली लक्षच नसतं."

"असं कसं म्हणतोस ?"

"कारण ती फॅशनच्या मागं लागली आहे. तिने माझ्यावर खरंखुरं प्रेम करावं असं माझं मत नाही. पण तिने तसा आभास निर्माण करावा. कारण त्यासाठी तर आम्ही तिला पैसे देतो. पण मुमताजचं वागणं स्वतःपुरतं असतं. ती इतकी घासाघीस आणि घाई करते की रंगाचा बेरंग होतो."

आम्ही हॉटेलमध्ये शिरताच त्याने वेटरला विचारलं, "माझं नेहमीचं टेबल खाली आहे ?"

"होय साहेब."

खिडकीजवळचं ते टेबल होतं. आपले हात घासत मनमोहन खाली बसला.

"तुला भूक आहे ना ?"

"होय."

"मला, चांगलं आणि खूप खाणारी माणसं आवडतात. मुमताज केव्हाच जास्त खात नाही. तिला वाटतं, आपण जाडचा होऊ. प्रत्येक गोष्टीसाठी योग्य समय हा आहेच. टेबलावर बसलं की खायलाच पाहिजे."

मुमताजविषयी त्याच्या मनात अढी होती.

"जास्त खाल्ल्यानं स्थूलपणा येतो आणि म्हणून काही बायका मोजकंच खातात."

"तू त्यातली आहेस का ?"

"नाही. पण खरं सांगायचं तर मी स्थूल असल्याचं, लोक म्हणतात."

"त्याकडे लक्ष देऊ नको."

खाताना दुसऱ्या कशाकडेही त्याचं लक्ष नव्हतं. सारखं तो खात होता. त्यात घाई होती. जसं काही ठराविक वेळात त्याचं खाऊन संपणार नाही आणि त्याला उपाशी पोटीच जावं लागणार होतं. खाताना तो डोळे उडवत, मान हलवत आणि ओठावरून जीभ फिरवत होता. पहिल्या प्रथमच मी मला न आवडणाऱ्या माणसाशी स्वेच्छेने शय्यासोबत करणार होते; पण त्या दिवसानंतर मी कसं वागायचं ते शिकले होते; पण त्या दिवसानंतर मी कसं वागायचं ते शिकले होते. रूपाने चांगल्या आणि स्वच्छ अशा माणसाला एका कटाक्षात घेरायची मला सवय लागली होती; पण मनमोहनबरोबरच्या त्या संध्याकाळी मी या धंद्यात नवखी होते. मला धंद्यातल्या खाणाखुणा काहीच कळत नव्हत्या. मनमोहन घाणेरडा नव्हता; खरं म्हटलं तर, जोपर्यंत तो तोंड उघडत नव्हता. तोपर्यंत त्याला हॅण्डसम् म्हणायला हरकत नव्हती.

यानंतर मनमोहनसारखी मला अनेक माणसं भेटली अन् एव्हाना मी तरबेज झाले होते; पण पहिल्या दिवशी मनमोहनच्या सहवासात मी अबोल झाले होते. मनमोहनला मी माझ्या घरी घेऊन गेले. माझी खोली, जिचा उपयोग मी लग्नानंतर करणार होते, त्या ठिकाणी मला गिऱ्हाईक घेऊन जावं लागत होतं. काय हा दैवदुर्विलास !

मी बोलत नाही असं पाहून तो म्हणाला, "बरं नाही का तुला ?"

"नाही, तसं काही नाही. इथं कोंडल्यासारखं वाटतंय." त्याने बिल दिलं आणि आम्ही बाहेर पडलो. टॅक्सी सुरू होताच तो माझ्या अंगावर रेलून बसला. मी काही वेळाने ड्रायव्हरकडे बोट दाखवून म्हणाले, "घरी जाईपर्यंत थोडा वेळ थांबता येणार नाही का ?








"मी त्याला पैसे देतोय. मला जिथं जायचंय तिथे नेण्याचं त्याचं काम. मी टॅक्सीत काय करतो हे त्याने पाहू नये." तो रागवून म्हणाला.

त्याला त्याच्या पैशाचा खूप जोर होता. अन् पैसे देऊन सारं काही खरेदी करता येते, अशी त्याची समजूत होती.

"वर चढताना आवाज करू नको. मी माझ्या आईबरोबर राहते." काळोखातून जिन्यावरून खोलीकडे जाताना मी त्याला म्हटलं.

त्याला मी माझ्या खोलीत नेले. आणि दिवा लावला. माझ्या खोलीतील फर्निचर पाहून मनमोहन खूष झाला. त्याला थांबायला सांगून मी बाहेर गेले.

आई मशीनवर शिवत बसली होती. मला पाहून ती उठू लागली. नेहमीप्रमाणे माझं जेवण वाढायला आत जायचा तिचा विचार होता.

"उठू नकोस. माझं जेवण झालंय." मी म्हणाले. "माझ्या खोलीत एक सद्गृहस्थ आहे. तू तिकडे येऊ नकोस."

"कुणी परका गृहस्थ ?" तिने आश्चर्याने विचारले.

"होय." मी तावडतोब म्हणाले. आणि तिने आणखीन काही विचारायच्या आत मी तिथून निघाले.

मी माझ्या खोलीत आले आणि दरवाजा बंद केला. मनमोहन अधीर होऊन माझी वाट पहात होता. तो पुढं आला आणि तो जसा घाईघाईने खात होता तसंच प्रेम करण्याची त्याची रीत होती. माझ्या शरीराच्या स्पर्शाने तो कामांध झाला होता. तो भराभर चुंबनं घेऊ लागला.

"तुझ्या आईला माहीत आहे ?" त्याने मध्येच विचारले.

"होय."

"मग ती काय म्हणाली ?"

"ती रागावली नाही ?"

हे सारे पुरुष मंडळीनी विचारायचे सामान्य प्रश्न होते. "ती रागावली नाही की तिला न आवडल्याचे तिने मला सांगितलं नाही. माझी मी मुखत्यार आहे. मी वाटेल ते करीन" मी म्हणाले.

माझं रेखीव शरीरसौष्ठव पाहून तो भांबावून गेला आणि तोंड उघडं टाकून माझ्याकडे पहातच राहिला.

त्याला आपल्या पैशाचा पुरेपूर मोबदला मिळवायचा होता. आमच्या दोघांच्या मीलनातून जितका आनंद उपभोगता येईल तितका आनंद त्याला उपभोगायचा होता. एकादा वादक अपलं वाद्य वाजवण्यापूर्वी त्याच्यावर मेहनत घेतो त्याप्रमाणे तो हव्या असलेल्या साऱ्या गोष्टी मी कराव्या म्हणून विनंती करीत होता. मी जरी तो सांगत होता तसं वागत होते तरी थोड्याच वेळात कंटाळले. सायंकाळी मी त्याला उत्तजन दिलं होतं. पण आता मला घृणा आली. थोड्या वेळात तोही दमला आणि आम्ही दोघं स्तब्ध पडून राहिलो.

"फार गुणी मुलगी आहेस तू. मला आता थोडीशी झोप घ्यायची आहे." तो कुशीवर झोपला. त्याचं टक्कल पडलेलं डोकं माझ्या छातीवर विसावलं होतं. त्याच्या केसाळ छातीला मध्यम वयानुसार चुण्या पडल्या होत्या. परक्या माणसाबरोबर झोपल्याचं माझ्या मनात येताच मला घृणा येऊ लागली; पण त्या घृणेने थोड्याच वेळात सहानुभूती धारण केली.

वीसएक मिनिटानंतर तो उठला.

"मी जास्त झोपलो का ?"

"नाही."

"मला आता बरं वाटतंय." अंथरुणातून उठत आणि पंजे घासत तो म्हणाला, "निदान वीस वर्षांनी तरी लहान झाल्याचं मला वाटतंय." तो आनंदाने भरभर कपडे करू लागला.

"तुला पुन्हा केव्हातरी भेटायची माझी इच्छा आहे. कशी भेट होईल ?"

"मुमताजला फोन करायचा. तिला मी दररोज भटते." त्याने पाकीट हातात घेतलं, आणि विचारलं, तुला किती पैसे हवेत ?"

"मला खूप पैशांची गरज आहे. जेवढे देशील तेवढे हवेत."

प्रत्येक गोष्टीला योग्य किंमत असते. मला तुझ्याकडून खूप आनंद मिळाला. मुमताजपेक्षा काही चांगल्या गोष्टी तू मला दिल्यास, म्हणून तुला जास्त पैसे मिळायलाच हवेत.

मुमताजने सांगितल्याप्रमाणे तो उदार होता. त्याने दिलेले पैसे खूप होते. ते मी हातात घेतले तेव्हा, रामने दिलेल्या पैशांच्या वेळी जे वाटले तेच आता वाटले. त्याचे आभार मानून काळोखातच त्याचं चुंबन घेतलं. मी त्याचा हात पकडला आणि

लोकशाही कॅबेरे



भारतीय आवृत्ती

काळोखातूनच त्याला बाहेर नेलं. आई हे सारं चोरून पाहते असं मला क्षणभर वाटलं. मनमोहन गेल्यावर ती माझ्या झिंज्या ओढणार असं मला वाटलं. कारण जेव्हा जेव्हा मला राजेशच्या मालकाच्या बंगल्यावरून यायला वेळ होई; तेव्हा तेव्हा तिने असेच केले होते.

"बरं जातो. मी मुमताजला फोन करेन." मनमोहन निघून गेला. तो खाली जाईपर्यंत त्याच्याकडे पहात राहिले आणि नंतर घरात गेले.

मी श्वास रोखून आईच्या हातात पैसे दिले. तिने माझ्याकडे पाहिले. तिच्या चेहऱ्यावर दुःखाची छाया होती.

"तू आत असताना मला बाई खूप भीती वाटत होती."

"भीती कसली ?"

"कसली देव जाणे. प्रथम मला एकटं एकटं वाटू लागलं आणि नंतर मी मेले असा भास झाला."

"पण असं तुला कां वाटावं ? तू काही म्हातारी झाली नाहीस इतक्या लवकर मरायला."

तिची मरणाची भीती ऐकून मला पण मरावेसे वाटू लागले.

"मला भूक लागली आहे." मी म्हणाले.

तिने माझे जेवण आणले. जेवल्यावर माझ्या जिवात जीव आला. मला बरे वाटले.

"मला झोप आली आहे." मी म्हणाले.

"मला तू सकाळी उठवू नकोस. मीच उठेन."

मी खोलीत गेले. कपडे उतरवले आणि काळोखात डोळे उघडे ठेवून पाठीवर पडले. त्यावेळी माझे मन कोरे होते.

"मी वेश्या आहे." मी जोराने ओरडले. ह्या शब्दाचा माझ्या मनावर काय परिणाम होतो हे मला पहायचे होते. पण माझ्या मनावर काहीच परिणाम झाला नाही. मी डोळे बंद केले आणि तावडतोब झोपी गेले.

## [८]

त्या दिवसापासून मनमोहन मला दररोज भेटू लागला. असे काही दिवस निघून गेले. एक दिवस त्याने मुमताजला फोन केला. मुमताज मला दुपारी भेटली तेव्हा त्याचा निरोप मला तिने सांगितला. मनमोहन त्यादिवशी दिल्लीला जाणार होता. त्यामुळे मी त्या रात्री राजेशला भेटण्याचे वचन दिले.

मी मनमोहनला जरी दररोज भेटत असले तरी एकाच माणसाशी सारखा संबंध ठेवायची माझी इच्छा नव्हती. कारण एकाच माणसाशी संबंध ठेवला की त्याच्याबद्दल वाटत जाणारे प्रेम, मन आणि शरीर यांचे स्वातंत्र्य गमावते.म्हणून प्रत्येक रात्री नव्यानव्या माणसाशी संबंध जोडण्याचा विचार मी नक्की केला होता. थोडक्यात सांगायचं तर मी वेश्या व्यवसायाला सुरुवात केली होती.

माझी लग्न करण्याची इच्छा मात्र अजूनही तशीच होती. एखाद्या म्हाताऱ्या माणसाची रखेली म्हणून राहून शेवटी त्याची बायको म्हणून राहाण्यापेक्षा एखादा नवा तरुण मला पकडायचा होता. त्याच्यावर प्रेम करावयाचे होते. आणि मग जमलं तर लग्नही करायचं होतं.

आता माझा मार्ग बदलला होता. मी जशी चांगली पत्नी बनू शकले असते तशी चांगली वेश्याही बनू शकणार होते याची खात्री होती. पण मला मघला मार्ग म्हणजे रखेली बनायचे नव्हते. धनलाभाच्या दृष्टीनेही रखेलीपेक्षा वेश्याव्यवसाय चांगला होता.

प्रत्येक रात्री मनमोहनबरोबर मी ठरलेल्या हॉटेलात जात असे आणि नंतर मनमोहन माझ्यावरोबर शय्यासोबत करी. माझ्या आईने माझ्या सायंकाळच्या कार्यक्रमाविषयी विचारायचे सोडून दिले होते. फक्त रात्री झोप आली की नाही इत्यादि ती सकाळी चहा घेऊन आली की विचारी. मनमोहन मला रोज ठराविक पैसे देत असे. आणि ते मी आईच्या ड्रॉवरात ठेवत असे. ड्रॉवरमध्ये पडणारी पैशाची भर आई पाहत होती; पण त्याबद्दल ती चुकूनही कधी बोलली नाही.

मी त्या दिवशी राजेशला भेटले. त्याच्या गाडीत बसून आम्ही दोघं त्याच्या मालकाच्या बंगल्याच्या दिशेने निघालो.

"आईचं काम आज लवकर संपलेलं दिसतंय." तो आपल्या विशिष्ट आवाजात म्हणाला.

"होय."

"आश्चर्यच आहे."

"असं कां म्हणतोस ? खरं नाही वाटत तुला ?"

"माझा तुझ्यावर विश्वास नाही."

"तू माझा हेवा करतोयस."

"कशाला हेवा करू ?"

"नाही कसं. माझ्याशी प्रतारणा करणार नसलास तर कबूल करशील."

त्याच्या मनाला ते लागलं. "जाऊ दे ग आता. तुझ्यावर कोण विश्वास ठेवणार ! तुला इतकं काम असतं, की मला पाच मिनिटं भेटायला सापडत नाहीत."

"खरंच आहे. मी खूप काम केलंय या दिवसात."

आणि खरंच होतं ते. मनमोहनवरोवर प्रत्येक रात्र मी घालवत होते. त्यामुळे थकून जात होते. "सारं देणं देऊन टाकून, मला नवे कपडे शिवता येतील इतके पैसे मी जमवले आहेत," मी हसून म्हणाले, "आता तरी आपण लग्न करूया !"

तो काहीच बोलला नाही. मी त्याचे चुंबन घेतले आणि म्हटले, "तू माझा कां बरं हेवा करतोस ? तुझ्याशिवाय माझ्या जीवनात दुसरा कोणताही पुरुष आला नाही."

आम्ही बंगल्यावर पोहोचलो तेव्हा काळोख पडला होता.

"मला तुझ्या खोलीत जायचं नाही."

"कां बरं ?"

"मला तुझ्या मालकिणीच्या खोलीत प्रेम करायचं आहे."

"तुझं डोकं ठिकाणावर आहे ना ?"

"मला तशी लहर आली आहे. पण त्यात काय बिघडलं ?"

"त्यांना कळून चुकलं तर ?"

"आणि मग तुझी नोकरी जाईल असंच ना !" मी त्याच्याकडे कुत्सित नजरेनं पाहिले.

"तू अशा रीतीनं मला विचारतेस ?"

"मग कसं विचारू ? तुझं माझ्यावर खरं प्रेम असेल तर हा विषय पुन्हा काढू नकोस."

"मी खरंच तुझ्यावर प्रेम करतेय. पण मला काहीतरी भानगड व्हायला नको."

"आपण काळजी घेऊ या.'

"नकोच !"

मी शांत होते. "मी तुझी प्रेयसी याचना करते आहे. आणि तू नकार देतो आहेस." मी काहीच घडलं नाही असं दाखवलं. "तू मला नाकारतोयस कारण तुझी मालकीण जिथं झोपते तिथं मी झोपणार, ती ज्या उशीवर डोकं ठेवते तिथं डोकं ठेवणार. तुला काय वाटतं ती माझ्यापेक्षा सुंदर आहे."

"नाही. पण !"

"माझ्याशी बरोबरी करायला तिच्या सारख्या चारजणी यायला हव्यात. पण तुला जर तसंच वाटत असेल तर मी आपली जाते कशी ! तू तुझ्या मालकिणीच्या उशीशी आणि गादीशी प्रम कर."

त्याला त्याच्या मालकाच्या संपत्तीचा भलताच गर्व होता. पण जेव्हा मी असं बोलले तेव्हा तो भांबावून गेला. तो माझ्या मागोमाग आला. माझं हे उग्र स्वरूप तो प्रथमच पहात होता.

थोडया वेळानं तो म्हणाला, "तुला पाहिजे तर आपण वरती जाऊ."

मी थोडा वेळ त्याला माझी विनवणी करू दिली. नंतर मी त्याच्याबरोबर वरच्या मजल्यावर गेले. पहिल्या वेळेप्रमाणेच प्रत्येक पायरीवर आम्ही चुंबनं घेत होतो. पण आता आमच्या मनात एकमेकांविषयी वाटणारा ओलावा नव्हता. निदान माझ्यातरी !

मी त्याच्या मालकिणीच्या गादीवर बसले आणि त्यानं घाबरून पुन्हा विरोध केला.

"खरंच तू ह्या गादीवर झोपणार ?

"कां नको ?"

त्याची मन:स्थिती बिघडली होती. मी बाथरूममध्ये गेले. गिझर ऑन केला. कोमट पाणी सोडलं. राजेश माझ्या मागोमाग आला. त्यानं पुन्हा विरोध केला.

"आंघोळ पण घेणार ?"

"प्रेम केल्यावर ती दोघं आंघोळ नव्हती का घेत ?"

"ती काय काय करीत होती हे मला कसं कळणार ?" त्याने खांदे उडवले.

"माझ्या खोलीपेक्षा इथं खरंच बरं वाटतंय."

मी राजेशच्या मानेभोवती हात घालत म्हटले, "आपल्या दोघांचं एक घर असावं असं नाही का तुला वाटत. इतकं चांगलं नसलं तरी चालेल." मी असं त्यावेळी कां म्हटलं मला समजत नाही. कारण ही गोष्ट अशक्य कोटीतली होती.

"जरूर होईल." असं म्हणून त्याने माझं चुंबन घेतलं.

"दोन खोल्या आणि सैंपाकघर. सारं कसं स्वच्छ. पण ते माझं स्वत:चंच असायला हवं. आपण रविवारचं बाहेरच जायचं. घरी काहीच करायचं नाही."

मी आपली सांगत होते. एखाद्या पाठांतर केलेल्या नटीप्रमाणे. पण त्याचं लक्ष कुठं होतं त्यावेळी. मी अजूनही राजेशवर प्रेम करत असल्याची मला जाणीव झाली. त्याने मला कुरवाळलं. आणि त्याच्याबद्दल असलेली माझ्या मनातली अढी नाहीशी झाली. त्याच्याविषयी प्रेम उफाळून आलं.

"अरे राजेश तू कित्ती चांगला आहेस. मला तुझ्या कुशीतच मृत्यु यावा असं वाटतं."

ती खोली पांढऱ्या रंगाने रंगविली होती. खिडक्यांनासुद्धा पांढरे पडदे लावले होते. गादीवरच्या पांढऱ्या चादरीवर पडल्यामुळे मला झोप येऊ लागली.

"राजेश" मी त्याच्या कानात म्हणाले, "तुझ्या बायकोचे नाव आहे वासंती."

त्याच्याही डोळ्यात झोप तरळत होती. बायकोचे नाव

[पान ५७ वर पहा]











......बार्बारा पेटन या सुंदर आणि सुविख्यात नटीच्या आत्मकथेचा हा शेवटचा भाग...जे माझ्या वाट्याला आलं ते मी माझ्या मगदुरा-प्रमाणे स्वीकारलं...भोगलं असं तिचं म्हणणं... ...तिला तिच्या जिण्याबद्दल कधीच शरम वाटली नाही...पश्चात्ताप झाला नाही......

# जिणे न माझे लाजिरवाणे

— प्रभाकर अत्रे





फ्रँकॉट टोन

टॉम नील

जम्स कॅग्ने

गॅरी कूपर

फ्रँक सिनात्रा

ग्रेगरी पेक

## [८]

तुम्हीच तुमचा तिरस्कार करायला लागता तेव्हा जागा वा माणसे बदलून काही परिस्थिती पालटत नाही असं म्हटलं जातं. ते खरं नाही. चांगल्या स्थितीपालटात तुम्ही पुनः स्वतःवर प्रेम करू लागता. मी तसं करू लागले.

मेक्सिकोत माझं सिने-नटी म्हणून आगत-स्वागत झालं; पण मला ते नको होतं. तो गौरव होता तो तारुण्य, रुप, शरीराचा होता, माझा नव्हता. मला माणसात यायचं होतं. जमिनीवर वावरायचं होतं. सामान्य माणसासारखं सामान्य पण प्रामाणिक जिणं जगायचं होतं. मेक्सिकोत त्याला अनुकूल वातावरण होतं. सारे गरीब होते. सारं साऱ्यांचं होतं. कुणी उपाशी रहात नव्हता. सिनेमाच्या मागण्या आल्या पण नाकारल्या–काही करीत नव्हते. पोहत राहणं हा एकच उद्योग मला होता.

तेथे एक कोळी माझ्यावर खूप झाला. त्याने माझ्याशी लग्न केलं. तो मासे पकडीत फिरे. मी बोटीत ऊन व हवा खात पडून राही. पडल्या पडल्या विचार करीत राहण्याचा छंद जडला. जे जे घडलं त्याचा विचार ! वाटलं—अजून सारं सुधारेल—माझी कविता मला परत मिळाली. अनवाणी भटकले तरी मला कुणी इथे हटकणार नव्हतं. पकडलेल्या प्रत्येक माशागणिक आपल्या पत्नी—प्रेयसीची चुंबनं घेण्याची तेथे पद्धत होती. त्यामुळेही ईर्षा पेटत असेल आणि बायकाही जाण्याचा आग्रह धरीत असतील.

तेथे रहात असताना माझी प्रकृती झकास झाली. कांती पालटली. मधल्या काळात जे घडलं ते सारं कसं घडलं याचं मलाच आश्चर्य वाटू लागलं. अमेरिकन वृत्तपत्रे—नियतकालिके वाचत असताना मीच स्तिमित होत होते.

मी मेक्सिकोत राहिले असते तर मी कदाचित खूप सुखी झाले असते. पण—

एक दिवस मी नौकेत पडून होते. वर निळं आकाश—शेजारी पाणीच—पाणी. पक्षी उडत येत. जात. एक पांढरा पक्षी माझ्या नौके-भोवती घिरट्या घालीत होता. त्याने अचानक पाण्याच्या दिशेने झेप घेतली. आणि मी पहातच राहिले. तो पक्षी पाण्यात ओढला गेला पुन्हा तो वर आलाच नाही. येवढ्या मोठ्या पक्षाला ओढणारा मासा असेल ? की दुसरा एखादा प्राणी ! की ती सरळ आत्महत्या असेल ? आताच तो होता. आता तो नाही !

त्या घटनेचा खोल ठसा माझ्या मनावर उमटला. मी ती घटना मोलकरणीला सांगितली. दीराला सांगितली. नवऱ्याला सांगितली. मख्खपणे त्या साऱ्यांनी ती ऐकून घेतली. आणि मी प्रथमच एकटी उरले. मला काय म्हणायचं होतं ते त्यांना समजलंच नाही. आमच्यात जणु 'संवाद' उरलाच नाही. त्यांच्याप्रमाणे केवळ जगण्यासाठी जगणं ही कल्पना मुळी मला सहनच होण्यासारखी नव्हती. मी माणूस होते. सजीव माणूस. भाजीपाला नव्हते. मला भावना होत्या. जग-ण्याला काही अर्थ असतो, असावा अशी माझी धारणा होती. काही निर्माण करावं, घडवावं—जे मागे उरेल, स्मृतिरूप होईल—असं मला फार वाटायचं.

त्या क्षणी मला अतीव सुख आणि आनंद देणाऱ्या आणि माझ्या-वर दु:खाची धोंडफेक करणाऱ्या ह्या मातीचं आणि माझं नातं जणु संपलं. त्यानंतर जे जे घडलं ते मी स्वीकारत गेले.

मी तशी सुखात होते. नवऱ्याचे प्रेम लाभले होते. माझी कविता त्याला समजत नसली तरी "वा: ! सुंदर" असं म्हणून तो आनंद व्यक्त करीत होता. आनंदाने जगणं येवढंच त्याला ठाऊक होतं. उगाच डोकं शिणवीत बसणं त्या मंडळींना ठाऊक नव्हतं. ते बरोबर नाही असं कोण म्हणणार ?

एक नवी जाग येत होती. चुका कळल्या होत्या. त्यांनी मला अंत-र्मुख केलं होतं; पण माझ्या संसारात वरकरणी तरी मी सुखी होते. द्वंद्व मात्र चालू होते. नवऱ्याला ते दिसले. तो मात्र आनंदात राह-ण्याची विनंती करू लागला. 'मी सुखात आहे' मी त्याला म्हणाले. तशी मी सुखी होते आणि नव्हतेही. मी आपण होऊन झेप मात्र घेणार नव्हते. ते काम मी दैवावर सोपवले होते. आणि दैवाने ती संधी आणून दिली.

एक दिवस मी आणि जॉर्ज (पती) बोट घेऊन मच्छीमारीसाठी गेलो होतो. आणि अचानक आकाशात कृष्ण-मेघ जमू लागले. पाणी नाचू लागलं. वाऱ्याने नर्तन सुरू केलं. जॉर्ज म्हणाला, "संकट चालून येत आहे" तो वादळाचा इशारा होता. आम्ही वेगाने परत फिरलो आणि एका लॉग-बोटीत निवाऱ्यास आलो. मला ते वादळ पहायचं होतं. कृष्ण मेघांचा समूह पहायचा होता. नाचणाऱ्या लाटा पहायच्या होत्या. पण नवऱ्याने मला आत ढकलले. बोल्ट लावून घेतला. पण मला त्या कल्पनेची जणु झिंग चढली होती. मी बाजूची खिडकी उघडली. वाऱ्या-पावसाचा प्रचंड तडाखा अंगावर झेलीत मी माझे कपडे उतरून टाकले. मला त्या असामान्य अनु-भवात न्हाऊन निघायचं होतं. मी ते केलं. नवऱ्याने मला सावरण्याचा यत्न केला. मी झटापट केली. मला त्या वादळाची झिंग जणु चढली होती. मी मोठ्याने ओरडत होते "मारून टाक—सारं नष्ट करून टाक. तुझ्या प्रचंड तडाख्याने हे सारं जग उध्वस्त करून टाक."

नवऱ्याने मला सुरक्षित जागी नेलं. त्या वाऱ्या-पावसाने मला जणु नवी जाग दिली. चैतन्य दिलं. "मला घट्ट धर, काय हवं ते कर" मी नवऱ्याला म्हणाले. त्याने थंडपणाने माझ्या अंगावर एक घाणेरडे ब्लँकेट टाकले.

मी खूप रडले. तो दमून खाली पडला. उठल्यावर म्हणाला "ठीक ठीक !" होकार देत मी कपडे चढविले. दोन वर्षे मी वेगळा पोषाख जणु अंगावर चढविला होता. त्या दिवशी मला माझं रूप परत मिळालं. माझा वेष परत मिळाला. मी पुन्हा बार्बारा पेटन झाले. दोन वर्षांचं स्वप्न सरलं होतं. मी हॉलिवुडला परतले.

**विलक्षण विद्यार्थी**

मेक्सिकोहून मी लॉस एंजेलीसला आले. जॉर्जला घटस्फोटाची नोटीस दिली. ती सर्व वृत्तपत्रातून प्रसिद्ध झाली. उद्योग हवा होता. दोन वर्षे तशी सुखात गेली होती. प्रकृती सुधारली होती. अनेक पार्ट्यांना गेले; पण नोकरीचे काम जमले नाही. एक माणूस मद-तीला आला. त्याचे एक ड्रामा-स्कूल होते. तेथे त्याने मला नोकरी दिली. तेथे वर्गात एक तरुण असा होता की जो सारखा माझ्याकडे टक लावून पहात रहायचा. मला संकोचल्यासारखे होई. मध्येच धागा तुटल्यासारखा वाटे. एकदा त्याला मी त्याबद्दल विचारले तेव्हा तो म्हणाला "अस्सं ? मला कल्पनाच नव्हती. मला जाणवलं नाही" तसे न पाहण्याचे त्याने आश्वासन दिले—पण नंतरच्या काही दिवसात तो पाहून हसायला लागला. मी त्याला परत हटकले, तेव्हा तो म्हणाला "मी खोटं बोललो. मी पाहिलेली सर्वात सुंदर स्त्री म्हणजे तुम्ही आहात. तुमच्याकडे पहात रहावंसं वाटतं." पुढे तो म्हणाला "मी सुंदर आहे असं लोक म्हणतात—पण कुणाही मुलीशी माझी मैत्री नाही. कशी करतात ते ठाऊक नाही."

"कुणाशी मैत्री करायची आहे तुला ?" मी.








"तुमच्याशीच!" तो थंडपणे, पण ठामपण म्हणाला.

"मी तुझी आई शोभेन येवढी मोठी आहे."

"पण मला तुमचीच मैत्री हवी. मला फक्त एक दिवस द्या. मार्गदर्शन करा. तुम्ही शिक्षिका आहात."

मी त्याला चित्रपटाला घेऊन गेले. परतताना तो मला घरी घेऊन गेला. त्याच्याजवळ खूप नाटचचित्रे आहेत असं तो म्हणाला. मी गेले. त्याचा संग्रह चांगला होता.

मग त्याने मला ब्रँडी दिली. स्वतःही घेतली. तो म्हणाला "आता काय करू या?" त्याचे हे वाक्य निराळे होते. चेहऱ्यावरचा भाव वेगळा होता. जणु मुखवटा गळून पडला होता. मी सावध झाले. उठत व त्याच्या गालावर टिचकी मारीत म्हणाले "गुड नाईट, जोनाथन."

त्याने झटकन माझ्या कंबरेत हात घातला आणि मला म्हणाला "अजून तर खूप शिकायचं आहे तुमच्याकडून."

मी जोराने त्याच्या थोबाडीत मारली. त्यानेही मला मारली. मी एका बारवर कोसळले. तो उठून चालत आला आणि मला घट्ट मिठीत घेत म्हणाला "आता मुकाटचाने खाली पडा टीचर, नाही तर तुमचा हा विद्यार्थी उद्या शाळेत तुमच्याबद्दल नसत्या कंडचा पिकवील" असं म्हणत त्याने माझ्या फ्रॉकची चेन मोकळी केली व त्याचे हात मांडचावरून फिरू लागले.

असले प्रकार, अनुभव मला नवीन नव्हते. मी जवळच्याच बारमधला मद्याचा एक चषक उचलला व त्याच्या तोंडावर ते मद्य फेकले. डोळचात मद्य गेल्याने तो ताडकन दूर झाला. त्याला एक धक्का देत मी म्हणाले "आज येवढा पाठ पुरे झाला, नाही का?" मी निघाले. तो मुलगा परत शाळेत आला नाही. पण त्याने खोटचा कंडचा मात्र पिकवल्या. परिणामतः नाटच-शाळेचा संचालक मला म्हणाला "एक महिना रजा घ्या. उन्हाळचाचेच दिवस आहेत."

मला नवी नोकरी शोधायला हवी होती. माझ्याच व्यवसायातली! एका रेसकोर्स-बारमध्ये मला असा निर्माता भेटला. त्याला हवे होते पैसे. मी तर खलास झाले होते. "धीर धर. भिऊ नकोस" तो म्हणाला. नंतर त्याने व्यवस्था केली. काम सुरू झाले. मध्येच साथीदाराने साथ सोडली. ७५००० डॉलर्स हवे होते. तरच चित्र पूर्ण होणार होतं. एका ब्रोकरने पैसे देऊ केले. माझ्या सहवासाची किंमत म्हणून! त्याला माझ्यात पूर्वीपासून इंटरेस्ट होता. पिक्चर चालू झाले. आणि एक आठवडचानंतर मी त्या ब्रोकरबरोबर प्रवासाला गेले.

## पुन्हा एकदा पडद्यावर

दैव साथ देत असतं तेव्हा प्रत्येक गोष्ट चांगली ठरत जाते. ते प्रतिकूल असलं की चांगल्या गोष्टी वाईट ठरतात. तुम्हाला विनाशाकडे खेचत नेतात. साधी गोष्ट सुद्धा गोत्यात नेते. मला कामे हवी होती. अभिमान सोडायला हवा होता. मी तो सोडला. मद्यही सोडले. सामान्य कामे करू लागले. पण द्रव्य अपुरे होते. वागणूक फार हलकी होती. मी पुन्हा मद्य घेऊ लागले.

पण विझण्यापूर्वी दिवा मोठा होतो म्हणतात. माझ्या आयुष्यात तसंच घडलं. एके रविवारी मी व माझी सहचरी इफी सॅण्टा मोनिका बीचवर सूर्यस्नान व समुद्र स्नानासाठी गेलो होतो. दोघींनी अगदी आवश्यक तेवढे कपडे ठेवले आणि वाळूत पडून राहिलो. तेवढचात कुणी तरी माझ्या मांडीला पायाच्या नखांनी टोचत असल्याचे जाणवले. मी उठून त्या तरुणाला दम भरला. वीस बावीस वर्षांचा तो देखणा तरुण होता. तो हटला नाही. उलट त्याच्यामुळे व त्याच्या श्रीमंत चुलत्यामुळे मला चित्रपटात अखेरची व महत्त्वाची भूमिका करण्याची संधी मिळाली. त्या चित्रपटाचे नाव '**ब्राइट ऑफ द गोरिला**' असं होतं. त्या चित्रपटानं पुन्हा विश्वास दिला. पैसे दिले. मित्रांना वाटलं मी पुन्हा कीर्ती, यश मिळवणार. पण तसं घडणार नव्हतं. दैव अनुकूल नव्हतं. विश्वास नव्हता.

मला निवारा हवा होता. आधार हवा होता. अशा शोधात असतानाचा एक मजेशीर अनुभव सांगते. एका पार्टीच्या वेळी मला डोनाल्ड भेटला. तो वकील होता. त्याचं बोलणं, वागणं मोठं शिस्तीचं होतं. सद्गृहस्थासारखं - रेखीव, चांगलं! परिचय झाला. आम्ही हिंडलो, फिरलो. चहा प्यायलो. मद्य घेतले. पण त्याच्या मनात नेमके काय ते मला कळत नव्हते. त्याच्याशी लग्न करून उरलेले आयुष्य चांगले काढावे अशी माझी धारणा होती. पण तो थंड होता. मख्ख होता. चुंबन घेताना सुद्धा तो खूपच संयम पाळीत होता. मला अर्थबोध होत नव्हता. शेवटी सहा आठवडचानंतर त्याने तोंड उघडले.

आणि ---

ऑफिस जागा, फर्निचर, पुस्तकालय व सेक्रेटरी येवढचा जामानिम्यासाठी त्याने पंधरा हजार डॉलर्सची मजजवळ मागणी केली.

आणि लग्न? त्याबद्दल तो काहीच बोलला नाही तेव्हा मी त्याला स्पष्टच विचारले. तो म्हणाला पंधरा हजार डॉलर्स दिलेस तर करूया लग्न!

मी अवाक् झाले. भयानक उपहास व क्रूर चेष्टा झाल्याची विदारक जाणीव मला झाली. मी त्याला हासडले व हाकलून दिले.

त्यानंतर मी एकदा (चवथं) लग्न केलं. पण ते फार काळ टिकलं नाही. तपशीलात जात नाही.

सारं संपलं होतं. करिअर, पैसा, उंची कपडे, दागिने, वृत्तपत्रातली कीरत—रोखलेले डोळे—स्वाक्षऱ्यांचे ते हात—सारं संपलं होतं.

एका सौंदर्यप्रसाधन केंद्रात मी काम करू लागले. कशाचीच शुद्ध उरली नव्हती. जगणे भाग म्हणून जगत होते.

## याला म्हणतात भाडे-वसुली

भाडं थकलं होतं. आणि माझ्या पर्समध्ये फक्त एक डॉलर शिल्लक होता. मालकिणीने दोनदा इशारे दिले होते. रिफ्रेजेटरमध्ये चीज व सोडा वॉटर होते. तो एक डॉलर घेऊन मी जेम्स कॅग्नेबरोबर ज्यात काम केले होते असे चित्र पहायला गेले—किस्

(पृष्ठ ५६ वर)









अनुक्रमणिका

# युरोपचे गोकुळ : कोपनहेगन

ह. सी. उर्सेकर
**ॲडिशनल चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट**

प्रवासवर्णन
लेखांक ७

## लोहगड ते लंडन



डेन्मार्क ! 'जगावे का मरावे' अशी स्फीन्क्सप्रमाणे एक शाश्वत विचारणा करणाऱ्या हॅम्लेटची कर्मभूमी म्हणजे वस्तुतः अकर्मभूमी! कारण अखेरपर्यंत या राजस राजपुत्राने (Sweet Prince) फक्त कार्याकार्य विचारात घालविला. इंग्लंडसकट युरोप कावीज करून महासागरालाही मर्यादेत ठेवण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या उर्जस्वल कॅन्यूट राजाची ही भूमी ! अँडरसनच्या परिकथांचा हाच तो मनोहर प्रदेश. दूध, लोणी, चीज–प्रसिद्ध युरोपचे गोकुळ म्हणून ओळखली जाणारी कोपनहेगन ही त्याची राजपुरी ! कोपनहेगनलाच उत्तरेचे पॅरीस म्हणतात. कारण डॅनीश लोक फ्रेंचाप्रमाणे 'विक्रम-विलास येथे नांदती' या कोटीतलेच

नकाशात डेन्मार्क हा छोटासा देश नॉर्वे व स्वीडन यांच्या सिंहाच्या जवडयासमोर शेळीसारखा उत्तर सागरात लोंबकळल्यासारखा दिसतो असे वर्णन स्वीडनबद्दल लिहिताना मी केले आहे. पण ऐतिहासिक दृष्टीने मूल्यमापन केले असता डेन्मार्क म्हणजे शेळीचे कातडे पांघरलेला सिंह आहे. युरोपच्या इतिहासात पहिले आक्रमक राष्ट्र म्हणजे डेन्मार्क. पहिले साम्राज्य स्थापले या डॅशींग डॅनीश लोकांनीच. जगातील एक सर्वात जुने पण अजूनही अस्तित्वात असलेले राज्य म्हणजे डेन्मार्क ! दहाव्या शतकात कॅन्यूट राजाने इंग्लंड कावीज करून अठरा वर्षे राज्य केले. नार्वेसुद्धा कित्येक शतके डेन्मार्कच्या अंमलाखालीच होता. ह्या समशेरीच्या साम्राज्याच्या ऐतिहासिक परंपरेचे गेल्या शतकात निराळ्या अर्थाने पुनरुज्जीवन झाले. समशेरीच्या साम्राज्याऐवजी सासऱ्याचे साम्राज्य अस्तित्वात आले. डॅनीश राजे नववे ख्रिश्चन यांच्या मुलींचे विवाह संबंध युरोपीय राजांशी झाले व त्यामुळे ते युरोपचे सासरे म्हणून ओळखले जात.

डेन्मार्क हा एक प्रचंड द्वीपसमूह आहे. यात सुमारे पाचशे छोटी मोठी बेटे आहेत, पण त्यातील चारशे मात्र निर्मनुष्य ! जटलँड भागाच्या वेचाळीस मैलाच्या सरहद्दीने उत्तर जर्मनीशी हातमिळवणी केली आहे. म्हणजे पाणिग्रहणामुळे डेन्मार्क हा देश युरोपीयन झाला व त्याचा राजा युरोपचा सासरा होऊ शकला.

### मग थाट काय तो पुसता

ऑस्लोहून स्कॅन्डेनेव्हियन विमान नऊ वाजता सुटले. दहा वाजता कोपनहेगनच्या विमानतळावर आमच्या विमानाने चक्रार्पण केले. तेव्हा ऑगष्टी ऊन झक्क पडले होते. नोरेॲले रस्त्यावरील एगमॉट् हॉटेलात आधीच खोलीचे आरक्षण केले असल्याने हॉटेल शोधण्याच्या वेदना व वेळ वाचला. पॅरीसला हॉटेल निश्चित न केल्याने फोनाफोनी करून प्रोग्रेस हॉटेलवर पोहोचेपर्यंत दोन तास काळजीत फुकट गेले. ऑस्लोचे रस्ते विशेष रुंद नव्हते पण कोपनहेगनचे रस्ते मात्र प्रशस्त गजबजलेले वाटले. डेन्मार्कचे अठ्ठेचाळीस लाख वस्तीतील सुमारे बारा लाख म्हणजे एकचतुर्थांश लोक राज-





अनुक्रमणिका

धानीत राहतात. ही एक युरोपातील सर्वात जुनी राजपुरी आहे. भारतीय असो किंवा डॅनीश असो प्रत्येकाला शहर हवे. त्याशिवाय जणु काय त्या देशाचे 'नागरिकत्व' सिद्ध होणार नाही. शहर म्हटले की सुखसोयी सज्ज. मग थाट काय तो पुसता !

कोपनहेगनच्या रस्त्यामधील सायकलींची वर्दळ पाहून पुण्याची आठवण झाली. पराक्रमाप्रमाणेच सायकली हे एक साम्य कोपनहेगन व पुण्यात मला सापडले. डॅनीश लोक त्याचप्रमाणे (carefree) काळजीशून्य वाटले. पुण्यात हिंडताना मला नेहमी अशा वृत्तीची समोवती जाणीव होते. स्वानंदी स्वच्छंद यौवन कोपनहेगनच्या रस्त्यारस्त्यावर फुललेले दिसले. असे कळले की जगात सर्वात अधिक दुचाकी संस्था असणारे शहर म्हणजे कोपनहेगन. दिल्लीप्रमाणे येथे सायकलस्वारांकरिता रस्त्याच्या कडेला स्वतंत्र फुटपाथ आहेत. आचार्य अत्र्यांच्या 'प्रेमाचे अद्वैत' या कवितेत वर्णन केलेले डबल-सीट प्रेमप्रकरण मात्र नजरेस आले नाही. तेथे डबलसीट सायकली दिसतात. त्यांना सरळ रेषेत तीन चाके व चार पॅडल्स आहेत. इंग्रजीत या सायकल प्रकाराला 'टॅंडेम' म्हणतात. डॅनीश भाषेत काय म्हणतात हे कळण्यापूर्वीच कोपनहेगनहून मला कूच करावे लागले. विशिष्ट कालमर्यादेच्या विमानयात्रेत ही एक गैरसोय आहे. व हॉटेलांचे आगाऊ आरक्षण केले होते म्हणून निश्चित केलेल्या प्रवास कार्यक्रमामुळे कोपनहेगन आवडले तरी 'उद्या नको, जाऊ परवा' वगैरे देशी दाखले उपयोगी पडत नाहीत. प्रोग्रॅम म्हणजे प्रोग्रॅम !

## प्रती बाजीराव : चौथा ख्रिश्चन

ऑस्लो शहराचे दर्शनीय वैशिष्ट्य म्हणजे अजबखाने, तर कोपनहेगनची खासीयत म्हणजे राजप्रसाद व राजपुतळे. ते पाहाण्या-साठी नगरदर्शनीने अडींच वाजता एगमॉंट हॉटेल सोडले. डेन्मार्कचा राजा चौथा ख्रिश्चन हा पहिल्या बाजीरावाप्रमाणे आक्रमी व परा-क्रमी, साहसी व शूर होता. तसा तो सौंदर्याचा भोक्ता होता. १६४३ साली डाव्या डोळ्यानजीक बंदुकीची गोळी लागून हा नरशार्दूल जखमी झाला होता. त्या गोळीचा भाग शरीरात सलत असूनही रणभूमीवर हा वीरपुत्र उभा राहिला व लढला. अखेर विजयश्रीने त्याच्या गळ्यात माळ घातली. रणांगणात जेथे धैर्य तेथे जय हेच खरे. नंतर ख्रिश्चन राज्याच्या डोक्यात घुसलेली ती धातूची गोळी शल्य चिकित्सकांनी काढली तेव्हा या बहाद्दराने त्याची सुबक कर्णफुले करवून घेतली व ती आपल्या डॅनीश मस्तानीला वापरण्यास दिली. ती पाहायला मी फार उत्सुक होतो.

पहिल्या बाजीरावाने १७३० मध्ये शनवारवाडा बांधला. तर या वीर-विलासी रणधुरंधराने रोझनबर्ग म्हणजे गुलाब-प्रासाद या नांवाचा किल्ल्यासारखा राजवाडा राजोद्यानात बांधला आहे. समोरच्या बाजूला उंच चौकोनी मिनार आहेत. मध्ये उत्तुंग राज-प्रासादाचे शिखर आसमानाशी स्पर्धा करीत आहे. त्यावरील उंच दांडी उंचावलेल्या खड्गाप्रमाणे वाटली. ख्रिश्चन राजाच्या उत्तुंग महत्त्वाकांक्षांचे प्रतीकच आहे ते. आवतीभोवती लाल, पिवळ्या गेंदेवाज गुलाबाचा नाजूक वेढा-विळखा ! मस्तानीच्या मिठीतून सुटून वैर्यधराप्रमाण "माझे मन कसे छावणीकडे धाव घेत आहे" असेच तो सेनानी म्हणत आहे असे ते उंच शिखर पाहून वाटले. हा वाडा म्हणजे डॅनीश गतवैभवाचे बोलके स्मारक होय. निरनिराळ्या डॅनीश राजांनी गोळा केलेले वस्तुसंग्रह कालानुक्रमे येथे नीटनेटके मांडून ठेवलेले आढळतात. राजदंड, रत्नजडित राजमुकुट, राजरत्ने वगैरेची रेलचेल आहे. एका डॅनीश राजाला आर्थिक अडचणीला तोंड देण्यासाठी आपला राजमुकुट गहाण टाकावा लागला होता. (तो परत सोडवून आणला म्हणा) आता तो या गुलाबी राजगृहात विसावला आहे. पेशव्यांना सुद्धा वारंवार सावकारांची कर्जे काढावी लागतच. लक्ष्मी ही एकूण चंचलच खरी. मग ती राजलक्ष्मी असो वा गृहलक्ष्मी. बाप्तीस्म्याचे एक रत्नखचित पाण्याचे गळके मांडे येथे ठेवलेले दिसले; पण बाप्तीस्म्याचा शाही समारंभ तसाच उरकून घेत असत. कारण ते जलपात्र पुराणे होते. परंपरेने पावन झाले होते.

## रक्ताची झाली फुले

डॅनीश बाजीरावांच्या मस्तानीने वापरलेली रक्तरंजीत बंदुकीच्या गोळीची केलेली कर्णफुले पाहून येथे अश्रूंचीच नव्हेत तर 'रक्ताची झाली फुले' असा साक्षात्कार झाला.

डेन्मार्कमधे राजाप्रमाणे गजराजालाही मानतात. हत्ती हे सामर्थ्य आणि शहाणपण यांचे प्रतीक समजले जाते. हिंदुस्तानात पद्माला मान आहे. संस्कृत कवींनी तर कमलाला इतके वेठीस धरले आहे की नेत्रकमलापासून पदकमलापर्यंत आपादमस्तक कमलमयच सर्व लक्षणा ! छत्रीसुद्धा कमलछाप ! त्यामुळे शासनाने गौरव करायचा तो पद्मश्री, पद्मभूषण वगैरे कमलांकीत किताबांनी. तसाच डेन्मार्कमध्ये हत्तीचे पदक हा सर्वश्रेष्ठ राष्ट्रीय सन्मान होय. येथे गळ्यातील माळात सुद्धा हत्ती गुंफलेले पाहून मला संभ्रम पडला की मी म्हैसूरात आहे की कोपनहेगनात. कार्लस्बर्ग या जगप्रख्यात डॅनीश बीयरच्या कारखान्याचे प्रवेशद्वार आम्हाला बाहेरून दाख-वण्यात आले. तेथे दोन प्रचंड दगडी कोरीव हत्ती आहेत. क्षणभर वेरूळचे कैलासलेणेच पहातोय असे वाटले.

रोझनबर्ग राजवास्तूतील सर्वात मोठा दरबार हॉल फार प्रशस्त व वैभवशाली आहे. भिंतीवर राजवंशातील वीर पुरुषांची मोठमोठी तैलचित्रे आहेत. ती बहुतेक फ्लेमीश चित्रकारांनी रंगविलेली आहेत. तेथील राजपुरुषांचे पुतळे म्हणजे फ्रेंच शिल्पज्ञांची कला-कृती होय. उंच उंच खिडक्यांच्या काचावरील सुंदर रंगीत मखमली वेलपत्त्या मन वेधून घेतात. उंच पाठीचे मखमली सिंहासन भव्य आहे. समोरच ठेवलेले तीन प्रचंड चांदीचे सिंह खरोखरीच सिंहा-सन हे नाव सार्थ करतात. एका उभ्या शेपटीच्या सिंहाखेरीज सर्व सिंह रक्षकाच्या पोझमध्ये डोळ्यात तेल घालून जणू उभे आहेत. १९४७ साली डेन्मार्कच्या राजाचे निधन झाल्यावर त्याच्या कॉफीन भोवती हे सिंह पहारा करीत ठेवले होते. समसमासंयोगाचे अन्य










समर्पक उदाहरण कोठून सापडणार निष्प्राणाचे निष्प्राण संरक्षक !

याच बादशाही हॉलमध्ये डेन्मार्क राजांचा राज्यारोहण समारंभ उत्कट उत्साहाने साजरा केला जातो. डॅनीश लोक आपल्या राजावर ब्रिटिशांप्रमाणेच फार प्रेम करतात.

नॉर्वे, डेन्मार्क, स्वीडन हे स्कॅंडनेव्हियन देश राजसत्ताक आहेत. हे लोक आपापल्या राजांवर सश्रद्ध प्रेम करतात, पण अडीअडचणीला एका देशाच्या राजपुत्राला दुसऱ्या देशाचे गादीवर बसविण्याचे ऐतिहासिक दाखले आढळतात. राजघराण्यात जन्म झालेला राजा हवा ! राजपरंपरेचा अभिमान मात्र तीव्र आहे. जेथे प्रेम तिथे अभिमान ! ऑगस्ट १९६८ रोजी नॉर्वेच्या राजपुत्राचा विवाह एका राजघराण्यातील युवतीबरोबर झाला. अनेकांनी त्याबद्दल नापसंती दर्शविली !

त्या गलबी प्रासादातून बसवाल्याच्या धाकाने आम्ही कसेबसे बाहेर पडून ख्रिश्चनवर्ग राजवाड्याकडे वळलो. फ्रेडरीक होम कालव्याच्या तटावरील मनोज्ञ बागेत उभा आहे हा ! कोपनहेगन हे युरोपातील एक पुरातन नगर आहे. त्याचा संस्थापक बिशप ॲब्स्लोन हा थोर युद्धनेता होता. त्याचा अश्वारुढ पुतळा या वाड्याच्या बागेत दृष्टीस पडतो. या वास्तूत डॅनीश पार्लमेंट बसते. पण सध्या पार्लमेंटचे अधिवेशन नसल्याने चर्चा ऐकण्याचा चान्स हुकला ! याची जुनी मूळ वास्तू नष्ट झाली. त्यावर या शतकाच्या सुरवातीला हा प्रचंड राजप्रासाद बांधण्यात आला. मात्र मध्ययुगीन लाकडी जिना बचावला होता. त्याचे पार्लमेंटच्या सदस्यांकरता लांब, सुबक डायनिंग टेबल बनवण्यात आले आहे. काय हे स्थित्यंतर ! सुमारे हजार वर्षे डॅनीश राजपुरुषांनी ज्याला पायदळी तुडवले त्यावर आजचे डॅनीश राजकारणी पुरुष हात मारीत आहेत !

ख्रिश्चनवर्ग राजवाड्यात अगदी संगमरवरी स्वच्छता आहे. ही निर्लेपपणा कायम ठेवण्यासाठी वाड्यात शिरताना आम्हाला बुटावरून मोठी पादत्राणे बांधायला दिली. म्हणजे आमच्या बुटाला ओव्हरबुट घातला. दिल्लीची जामा मशीद पहायला जाताना एक तर बूट काढावे लागतात किंवा असे बरबूट वापरावे लागतातच. हे बरबूट संगमरवरी फरश्यावरून फटाफट निसटत. मला तर वाटलं की आपण अधांतरी शुभ्र ढगांच्या पायघड्यावरून चालत आहोत.

या राजप्रासादात दिवाणीखास आहे. तिथे राजेसाहेब भेटीगाठी घेतात. दर महिन्यातून एक किंवा दोन सोमवारी हल्लीचे डेन्मार्कचे नववे फ्रेडरिक राजे राजदरबार भरवतात. हे राजवैभव पाहून थक्क मनाने पार्लमेंटगृहाबाहेर पडलो. त्याच्या दगडी दरवाज्यावर चार डोकी बसवलेली दिसली. एकाला दाढदुखी, दुसऱ्याला डोकेदुखी, तिसऱ्याला कर्णवेदना आणि चौथ्याला नेत्रवेदना होत आहेत असे दाखवले आहे. पार्लमेंट सभागृहाची ही विनोदी ओळख प्रथमदर्शनी हास्यकारक वाटते; पण विचारांती हा पार्लमेंटरी परिचय अगदीच अन्पार्लमेंटरी नाही हे पटते. कारण राजसत्ताकातील विधानसभा म्हणजे प्रजेच्या सर्व प्रकारच्या दुःखाना, वेदनांना वाचा फोडण्याचे एकमेव सुरक्षित व्यासपीठ ! राजाच्या अन्यायाविरुद्ध दाद मागण्याची यंत्रणा म्हणजेच राजसत्ताक राष्ट्रातील पार्लमेंट.

## स्वर्गातून पडलेला ध्वज व समशेर

ख्रिश्चनवर्ग राजवाड्यावर डेन्मार्कचा राष्ट्रध्वज डौलाने फडकत होता. आर्यांच्या वेदांप्रमाणे हे निशाण स्वर्गातून १२१९ साली नेमके डेन्मार्कमध्ये अवतरले. गंगावतरणाप्रमाणे तो ध्वज ग्रहण करणारा नीळकंठ कोण होता हे मात्र चौकशीअंतीही कळले नाही. किंग ऑर्थरची समशेरही अशीच स्वर्गीय देणगी होती असे मानतात. ध्वज, तलवारीसारख्या घन वस्तू स्वर्गापासून पृथ्वीपर्यंत न वितळता, न विरघळता घरपोच पोचू शकतात, तर आर्यांच्या वेदातील तरल शब्द वसिष्ठ, विश्वमित्रांच्या कानी अलगद उतरून त्यांनी ते शब्दबंध लोकांस सांगितले यात अविश्वसनीय काय आहे ? ख्रिश्चनवर्ग राजवाड्याशेजारी स्टॉक एक्स्चेंजची लांबलचक इमारत आहे. तिचा गगनचुंबी मनोरा ड्रॅगनच्या पिळलेल्या शेपट्यांच्या आकाराचा आहे. सत्ता आणि सट्टा यांचे हे सहज साहचर्य अर्थपूर्ण वाटले !

कोपनहेगन बाल्टिक समुद्रावरील झीलॅंड बेटावर वसले आहे. परीकथांचा सम्राट हॅन्स ख्रिश्चन ॲंडरसन हा डेन्मार्कमधल्या ऑडेन्स शहरातला. तो १८७५ साली हे जग सोडून गेला. डेन्मार्कचे पुरातन वातावरण चित्तरकथांच्या निर्मितीस अत्यंत अनुकूल. ॲंडरसनने परीकथा लिहून जगातील बालकांना आनंदी आनंद गडेचा अजोड अनुभव मिळवून दिला. ॲंडरसनचा रोझनवर्ग राजवाड्याच्या उद्यानात उभारलेला पुतळा आम्ही पाहिला होताच. याच ॲंडरसनने आपल्या कल्पना तरल वायवीच्या सहाय्याने निर्माण केलेल्या छोट्या सागरकन्येचा पुतळा पहायला मी फार उत्सुक होतो. कोपनहेगनच्या लॅंगेलीन या प्रसिद्ध राजरस्त्याजवळ बाल्टिकच्या पश्चिम किनाऱ्यावरील एका कातळावर ही काशाची सागरकन्या जन्मदिवसाच्या पोषाखात बसली आहे ! उजवा हात खडकावर

टेकलेला. डावा उत्संगावर आडवा ठेवलेला. किंचित् अवनत मुखी विषण्णवदना. ती सागरकन्या पित्याला – वाल्टिक सागराला–काय वरे सांगत असावी? अगदी 'किती किती सांगू तुला'चा आभास झाला मला. ती शिल्पकृती अत्यंत ताशीव, रेखीव व घोटीव आहे. शिल्पकाराने अॅन्डरसनच्या मानसकन्येला चिरंजीव केले आहे. नंतर लंडन हाईडपार्कमध्ये पीटरपॅनचा पुतळा पहायला मिळाला. जॉनबॅरीच्या पीटरपॅन नाटकाच्या नायकाला शिल्पकाराने साकारले आहे. एका कलाकाराने दुसऱ्या कलाकारास दिलेला भरीव धन्यवाद !

'आमची नगरदर्शनी' वस काचेची होती. त्यामुळे प्रवास करताना सर्वांना व्यवस्थित दिसे. टेप रेकॉर्ड केलेले धावते दिग्दर्शन अनेक भाषात चालू होते. आपल्याला हव्या त्या भाषेत तो वृत्तांत कर्ण उपकर्णाने ऐकू येऊ शकतो. आता साडेपाच वाजले. वसने आम्हाला तीन तास हिंडवले. राजवैभव पहायला मिळाले. याला पडले फक्त २४ डॅनीश क्रोन. एक क्रोन (क्राऊन) म्हणजे साधारण आपला एक रुपया.

वस सोडल्यावर पायी प्रवासास सुरवात केली. कोणत्याही नव्या शहरात (म्हणजे आपल्याला नव्या) पायी हिंडण्यानेच त्याची अधिक जवळची ओळख होऊ शकते. दुकाने, माणसे, रस्ते यांचा परिचय पादचाऱ्याला जितका होतो तितका वाहनचाऱ्याला होत नाही. पायी प्रवास हे प्रवासाची संहिता (टेक्स्ट) आहे. वाहनाने संचार करणे म्हणजे मूळ संहिता न वाचता गाईडवाचून पास होण्यासारखे आहे. एकात ज्ञान आहे, तर दुसऱ्यात कोरडे समाधान की मीही कोपनहेगन पाहिले.

**म्हैसुरी उद्यानाची आठवण**

टिवोली गार्डन् या नावाच्या करमणूक–उद्यानास मी नंतर भेट दिली. कोपनहेगनचे हे लास व्हीगास म्हणता येईल. आत जायला प्रवेश फी दोन डॅनीश क्रोन भरावी लागली. आपल्याप्रमाणेच डेन्मार्कची नाणावळ शतनिष्ठ आहे. शंभर ओरे म्हणजे एक क्रोन. सुरवातीस आईस्क्रीम दिसले. इतके संपन्न आईस्क्रीम अजून कुठेही मला आढळले नाही. डाव्या बाजूस नाट्यगृह आहे. त्यावरील पडद्यावर मयूर सिंहासनांचे चित्र वाऱ्यावर झोके खाताना आढळले. मला वाटले भारताचे मयूर सिंहासन नादीरशहाने झरणात तेहरानला नेले, तेथून डॅनीश लोकांनी कोपनहेगनला केव्हा नेले? पण कोपनहेगनला टिवोली उद्यानात आहे ते मयूरसिंहासनाचे चित्र! खरे रत्नखचित सिंहासन आमच्या मित्राने नुकतेच तेहरानला पाहिले. या क्रीडा उद्यानात रंगीबेरंगी प्रकाशझोतात उजळलेले पाण्याचे फवारे अनेक आहेत. म्हैसूरच्या वृंदावन उद्यानाची आठवण झाली. कारण सुंदर सुंदर फुलांच्या ताटव्यांवर रंगीबेरंगी प्रकाशाची आतषबाजी करून अँडरसन–कल्पित परी–उद्यानात आपण आलो की काय असा भास झाला. गोड मंजुळ संगीत तर सर्वदूर वातावरण प्रसन्न












करीत होते. नाच, गायन, वादनयुक्त संगीत, नवरंगी प्रकाशझोत, सुखमय जलाशय, आनंदोत्साही स्त्रीपुरुष यामुळे भवरील परी-देश पाह्यचा असेल तर मी म्हणन कोपनहेगनचे विलास–उद्यान टिवोली गार्डन पहा !

कोपनहेगनला राजनगरी (King's City) म्हणतात ते अक्षरशः सत्य आहे. राजांनी उभारलेले राजवाडे, राजपुरुषांचे पुतळे वगरे पाहून हे वर्णन सार्थ वाटते. आजही वडोद्यास आपण गेलो तर राजमुद्रेचा हा सर्वदूर प्रभाव आपल्यास दिसून येतो आणि त्यावरोवरच राजा–प्रजा यांच्यातील प्रेमभाव प्रतीत होतो. हे प्रेम खाडीलकरांच्या शब्दात व्यक्त करता येईल ते असे की 'हे चरण मला रविचंद्रकला, स्पर्शाया न वजे काया !"

टिवोली उद्यानातून परत एगमाँट हॉटेलात आलो. सायंकाळी पायी खूप हिंडल्यामुळे संपूर्ण डिनर घ्यायचे ठरवले व हॉटेलच्या रम्य उद्यानात रात्री भोजन घेतले. वाटाण्याचे सूप फारच चवदार होते. वेटर इंग्रजी वोलणारा तरतरीत तरुण होता. सहज चौकशी करता कळले की तो कोपनहेगनच्या वी. टी. कॉलेजात शिकत होता व उन्हाळ्याच्या सुटीत टूरिस्टची वर्दळ वाढल्याने हॉटेलात वाढप्याचे काम करीत होता. आईस्क्रीम खाताच विल आले. फक्त चौसष्ट रुपये ! आता दोन दिवस रात्री भोजनाला फाटा देऊन उपासाचे पुण्य जोडावयाचा निश्चय तेव्हा तरी केला.

पण डेन्मार्कच्या राजपुत्राच्या अभावी हॅम्लेट असा माझा डेन्मार्कचा दौरा झाला. कारण शेक्सपीयरची अमर कलाकृती 'हॅम्लेट'चे घटनास्थळ जो एल्सीनोर राजवाडा तो पहायला सवड नव्हती. कोपनहेगनपासून जवळच दुसऱ्या फरेडरीकने १५८५ साली बांधलेला क्रोनवर्ग दुर्ग आहे. त्यातच हा जगविख्यात एल्सीनोर राजप्रासाद आहे. यात म्हणे एक हॉल आहे, तो सर्व उत्तर युरोपातील लांबलचक दिवाणखाना होय. तेथून बोटीने दोन मैल अंतरावर स्वीडनचा किनारा तरळताना दिसतो. पण एल्सीनोरच्या तटावरील 'हॅम्लेट'ने पाहिलेले बापाचे भूत नक्की कुठे दिसले हे पहायची उत्सुकता होती. शनवारवाड्यातही नारायणरावाचे भूत आजही फिरते म्हणे ! मला वाटले दोन महिने अगोदर आलो असतो तर ! कारण दरवर्षी जून महिन्यात 'हॅम्लेट' नाटकाचा प्रयोग या एल्सीनोर राजवाड्यात अजनही करतात. तो पहाण्याचा योग्य नव्हता. 'रायगडाला जेव्हा जाग येते'चा प्रयोग रायगडावर किंवा 'भाऊबंदकी'चा शनवारवाड्यात करायला हवा !

ऑडेन्स येथे परीकथा सम्राट हॅन्स ख्रिश्चन अँडरसनच्या जन्मग्रामी अजून जुनी घरे आहेत. त्याचे स्वतःचे रहाते घर डेन लोकांनी व्यवस्थित ठेवले आहे. त्यात त्याचे लेखनसाहित्यही आहे म्हणे !

कोपनहेगनला 'मीट द डेन्स' म्हणजे डेन कुटुंबात मिसळा अशी एक संस्था डॅनीश प्रवासी प्रकल्पाच्या द्वारे चालविली जाते. अठ्ठेचाळीस तास आधी अर्ज केल्यास एका डॅनीश कुटुंबाशी तुम्हाला सामाजिक संपर्क साधता येतो. अर्थात वेळेच्या अभावी हीही संधी हुकली.

कोपनहेगन म्हणजे युरोपचे गोकुळ होय हे खरे। ! सुधादही दुधी विलोका ! डेन्मार्कच्या लोकसंख्येपैकी फक्त चतुर्थांश लोकच खेड्यात राहतात व त्यातील निम्मे म्हणजे सुमारे सहा लाख लोक शेती, दुधदुभत्याच्या उद्योगात गुंतले आहेत. भारतात याउलट जवळजवळ ऐंशी टक्के वस्ती खेड्यात आहे. पण डेन्मार्कमध्ये सहकाराने चमत्कार निर्माण केला आहे. सहकारी शेती, यांत्रिक अवजारांचा उपयोग, खते, स्वच्छता व शास्त्रीय दृष्टी यामुळे या देशात सकस दूधदुभते प्रचंड प्रमाणात निर्माण होते. जमीन ही संपत्ती पैदा करण्याची नैसर्गिक खाण आहे असे डेन लोक मानतात. आपली शक्ती, युक्ती, बुद्धी व श्रम यांच्या सतत सहाय्याने त्यांनी मातृभूमीला सुजलाम् सुफलाम् केले आहे. डॅनीश लोकांच्या गरजेपेक्षा तिप्पट अन्नधान्य ह्या राष्ट्रात पैदा होते. म्हणजेच पैदायीशीपैकी सत्तर टक्के धान्य निर्यात होते. प्रतिवर्षी येथे दीड लाख टन लोणी तयार होते. ताकावर डुकरे व वासरे पोसली जातात. त्यामुळे माणसांना दुधाची तहान ताकावर भागवण्याचा प्रसंग येत नाही ! स्कीम मिल्क लोणी काढल्यानंतर दुसऱ्या दिवशी सहकारी सोसायटीतून मूळ डेरीत परत करतात. त्यातील काहीचे चीज बनते. येथे चीज पुष्कळसे गुरांना चारतात. डेन्मार्कमध्य चीजचे असे चीज होते.

ह्या युरोपीयन गोकुळाचा विचार करता करता झोप लागली. उद्या सकाळी कलोनचे विमान पकडायचे होते ना !

**(क्रमशः)**







## एकवचन नि अनेकवचनातील फरक

अमेरिकेचे भूतपूर्व अध्यक्ष ॲडलाय् स्टीव्हन्सन नेहमी म्हणत– माणसे क्रूर असतात पण माणूस दयाळू आहे. माणसे लोभी असतात परंतु माणूस उदार असतो. माणसे विलोप पावतात पण माणूस अमर आहे.

## आता तुम्हीच सांगा...

निधी जमविणाऱ्या एका मंडळाचे अध्यक्ष एकदा गावातील एका धनाढ्य असामीकडे देणगी मागण्यासाठी गेले. ह्या श्रीमंताने अजून कोणालाही एक कपर्दिकसुद्धा देणगी न दिल्यामुळे अध्यक्ष जरा विशेष प्रयत्न करीत होते.

"या, या, बसा." अध्यक्षांचे त्या श्रीमंताने स्वागत केले. इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर अध्यक्षांनी विषयाला सुरुवात केली–"काय रावसाहेब, ह्यावर्षी म्हणे ६ लाख रुपयांचा आपल्याला फायदा झाला. आनंद वाटला आम्हाला हे ऐकून."

हे ऐकून ते श्रीमंत धीमेपणाने म्हणाले, "पण मला आनंद बिलकुल झाला नाही. कारण आपल्याला ठाऊकच आहे की मला माझ्या विधवा आईचे पालनपोषण करावे लागते. दुर्दैव असे की माझ्या बहिणीचा नवरा गेल्या वर्षीच अपघातात मरण पावला. त्यामुळे तिचा व तिच्या सहा मुलांचा सांभाळ मी करतो. माझ्या धाकट्या भावाला गेल्या युद्धात दुखापत झाल्यामुळे निवृत्त व्हावे लागले. त्याला पेन्शन म्हणून फार थोडी रक्कम मिळते. म्हणून दर महिन्याला मी त्याला थोडे पैसे देतो."

ही कर्मकथा ऐकून अध्यक्ष पुरे विरघळले ! आपल्या खिशातून पैसे काढीत ते ह्या "दुर्दैवी" श्रीमंताला मदत करायला निघाले. इतक्यात ते श्रीमंत म्हणाले, "थांबा इतकी तसदी घेऊ नका. मी जरी सांगितले तरी प्रत्यक्षात मी ह्यापैकी कोणालाही पैसे देत नाही. मग आपल्याला कां द्यावे ? बोला !"

## वेळापत्रकाचा हा उपयोग

वाईट हवेमुळे विमान उशीरा येणार होते. त्यात विमान "अजूनही अर्धा तास येणार नाही" असे विमानाची उशीरा येण्याची वेळ लक्षात घेऊन विमानतळावर पोहोचल्यावर जेव्हा एका प्रवाशाला सांगण्यात आले तेव्हा तो चिडला व विमानतळावरील अधिकाऱ्याला म्हणाला, "हल्ली विमाने नेहमी उशीरा सुटतात. तेव्हा तुम्ही 'टाईम-टेबल' प्रसिद्ध करण्याची तसदी तरी कां घेता ?"

तो अधिकारी शांतपणे म्हणाला, "त्याचं असं आहे, विमानाना किती उशीर होतो हे सांगायला आम्हांला सोपं जावं म्हणून आम्ही 'वेळापत्रक' प्रसिद्ध करीत असतो.

## चला....ऑर्डर देऊन टाका ....

तो आणि ती हॉटेलात गेले
तो म्हणाला—'काय घेऊ या ?'
ती म्हणाली—'काहीही'.
तो म्हणाला—'मग आपण 'मुके' घेऊ या !'

* * *




● न्यूयॉर्कमधील चेरोकी ह्या अवघ्या आठ हजार लोकवस्ती असलेल्या शहरात ललितकलेसाठी एक म्युझियम आहे. इतकेच नाही तर पेंटिंग व शिल्पकला शिकण्यासाठी शाळाही ह्या शहरात आहेत !

## तक्रार अशी मिटविली

एका ५० मजली इमारतीतील रहिवाशी 'लिफ्ट'साठी बराच वेळ ताटकळत उभे रहावे लागते म्हणून नाखूष होते. लिफ्टची 'धाव' जास्तीत जास्त वेगात व्हावी म्हणून त्या इमारतीच्या मालकाने अनेक तंत्रज्ञांचा सल्ला घेतला परंतु लिफ्टमुळे होणारी दिरंगाई कमी झाली नाही. शेवटी त्या मालकाने आपल्या बायकोला सल्ला विचारला. त्या चतुरांगनेने लगेच सांगितले, "प्रत्येक मजल्यावर लिफ्टच्या बाहेर मोठ्ठा आरसा बसवा !"

आणि काय आश्चर्य ? प्रश्न सुटला. लिफ्टची वाट पहात रांगेत उभ्या राहणाऱ्या ललना ह्यापुढे आरशात पाहून आपली वेणीफणी व कपडे नीट करण्यात वेळ दवडू लागल्या तर पुरुष स्त्रियांकडे सरळ दृष्टिक्षेप न टाकता आरशातून त्यांचे सौंदर्य न्याहाळू लागले !

## अजब उत्तर

आडवळणावर असलेल्या एका स्टेशनचा स्टेशनमास्तर फार आळशी होता. आपल्या स्टेशनवर वर्दळही फार नसते म्हणून तो स्टेशनची साफसफाई करण्याकडे फारसे लक्ष देत नसे. एकदा अचानक रेल्वे-इन्स्पेक्टरने त्या स्टेशनला भेट दिली. भोवतालचा धुरळा पाहून तो स्टेशन-मास्तरवर चिडला व म्हणाला, "ह्या टेबलावर पहा किती धूळ आहे ! बोटांनी माझे नावसुद्धा मी लिहू शकेन."

"मग काय झालं" स्टेशनमास्तर म्हणाला, "पण आपण सुशिक्षित आहात साहेब, हे विसरू नका !"

## त्यात काय

सुच्चासिंग -- कॅप्टन, तुम्ही अगदी सचिंत दिसता ?

कॅप्टन -- हो ना ! बोटीचं सुकाणूं तुटलं आहे.

सुच्चासिंग -- काही हरकत नाही. पाण्याखाली असतं ना ते ! मग कुणाच्या लक्षात यायचं नाही !

-- दि. भी. कराडकर








# ब्रह्मचारी एस्. एन्. डी. टी. त्!



... कंदमुळं नि सोमरस ... जीव अगदी नकोसा झालाय ... माणसांना मिळतात तसले रुचकर पदार्थ कोण देणार आम्हांला ? प्रसाद म्हटला तर खोबरं किंवा सुंठवडा ... त्याऐवजी बटाटावडा का नाही देत ? ...

मारोती आकाशातून उड्डाण करीत असतो. बरेच लोक त्याला पाहून ओरडतात "उडत्या तबकडचा, चंद्रावरचा माणूस" अन् विचारा धापा टाकीत उतरतो तो एस. एन. डी. टी. कॉलेजच्या गच्चीवर. तिथून तो खालच्या मजल्यावर येतो. तोच मुलींचा गलका त्याला ऐकू येतो. म्हणून तो पटकन् एका खोलीत शिरतो. आणि ती मुलींची बाथरूम असते. त्या गलबलत येणाऱ्या मुलींच्या घोळक्यातील एक मुलगी बाथरूम मध्ये शिरते. घामाने भिजलेल्या अन् थरथरत उभ्या असलेल्या मारोतीला पाहून ती एकदम किंचाळते.

**नीला**–आई ऽ ग ऽ ऽ

**कुंदा**–कायग नीला, किंचाळायला काय झालं ?

**नीला**–भू ऽ भू ऽऽ त !

**आशा**–भूत ? अग मेला कुणी तरी उडाण-टप्पू बसला असेल आत.

**मंदा**–काय ग बाई, मेल्यांची इथपर्यंत मजल गेली !

**उषा**–थांब, चप्पल काढते. अशी मारते एक त्याच्या की...

**रजू**–आपण किनई पोलिसांनाच फोन करू या !

**आशा**–अग, उठल्या सुटल्या पोलिस काय करायचेत. अन् एखादा हातभट्टी-वाला असला तर पोलिसांचीच चंगळ व्हायची.

**कुंदा**–मग मेल्याला बंदच करून ठेवू या आत.

**रजू**–अग पण खरंच कोणी आहे का आत ? ह्या नीलाला किनई भास झाला असेल.

**नीला**–हो ! भास झाला. तू जाऊन बघ आत. म्हणजे कळेल.

**रजू**–छे बाई ! आपण नाही आत जाणार. ए असं करू या आपण ....!

**उषा**–काय करू या ?

**रजू**–मला किनई एक आयडिया सुचलेय. आपण किनई असं करू या....?

**आशा**–अग पण काय करू या ?

**रजू**–मला किनई....









अनुक्रमणिका

**कुंदा**—डोंबलं तुझं! एक सारखं काय ग मला किनई....

**मंदा**—नाहीतर काय! हिचं मला किनई होईपर्यंत तो किनई पळून देखील जायचा.

**आशा**—छे ग, पळतोय कसला. वाटच नाही पळायला. मेल्याला असा झोडला पाहिजे

**उषा**—अग मण मांजराच्या गळ्यात घंटा कुणी बांधायची?

**रजू**—तेच तर मी सांगते. आपण किनई त्याला हाक मारून बाहेर बोलवू या.

**नीला**—अग, हाक काय मारणार? तूच मार हाक तुझ्या प्रियकराच्या नावाने. असला तोच तर येईल बाहेर.

**रजू**—ए, नीला. तुझ्या प्रियकरासारखा नाही हं माझा रमेश. असा बाथ-रूममध्ये तर मुळीच लपून बसणार नाही. मागे तुझा तो अनिल आला होता तुझ्या घरी आणि तेवढ्यात शेजारच्या बाईने ठोठावलं. त्यावेळी तो कसा लपला होता कपाटात! तोच असेल. लपायची किनई सवयच आई ना!

**नीला**—असू दे. अग त्यातच मजा खरी असते. हो की नाही ग मंदा.

**मंदा**—मला ग काय माहीत कशात मज्जा असते. आपण नाही बाई कुणाच्या प्रेमात पडलो अजून. अन् असल्या मागुवाई छुप्या वीरांवर आपण नाही बाई प्रेम करणार.

**कुंदा**—हो तर! तुला अगदी आघाडीवरचा एखादा कमांडरच मिळणार आहे.

**मंदा**—होय मुळी! आमच्या समोरच्या ब्लॉक मधला मधु गेलायच मुळी बॉर्डरवर. आल्यावर मी त्याच्यावरच प्रेम करणार.

**आशा**—येताना त्याने विचाऱ्याने एखादी वधू आणली नाही म्हणजे मिळवली.

**उषा**—अन् मंदावर प्रेम करण्याइतका का तो दुर्दैवी आहे!

**मंदा**—तुझा उल्हास माहीत आहे हं, काय ध्यान आहे ते. तुझंच नशीब म्हणा तो तरी मिळाला.

**नीला**—ए, तुम्ही अशा मांडत बसलात तर आत कोण आहे तो पळून जायचा. चला बघू या तरी आपण आत कोण आहे तो.

**आशा**—हो ग हो, चला.

(सर्व जणी घोळक्याने आत शिरतात. घामाने निथळत असलेला व मुलींच्या आवाजाने थरथरत असलेला ब्रह्मचारी मारोती गोंधळून जातो.)

**कुंदा**—अय्या ऽऽ अगदी मारोतीसारखा दिसतोय ग.

**मंदा**—ए, कोण रे तू? आणि इथे काय करतोस?

## प्रमोद गुप्ते

**मारोती**—मुलींनो, मी मारोती आहे!

**रजू**—खरा मारोती? म्हणजे देव?

**मारोती**—होय, मी खरा मारोती आहे. ज्याला तुम्ही गोडया तेलाने बटबटवता अन् शेंदराने मढवता तो मी मारोती!

**उषा**—खरं सांगतोस? घे देवाची शपथ. मी मारोती आहे म्हणून.

**मारोती**—अहो पण मी देवच आहे आणि देवाची शपथ कशाला घेऊ?

**नीला**—इश्य! खरा मारोती म्हणे. आणि देव इथे असा लपून कशाला बसेल?

**कुंदा**—आणि एवढा खरा देव पहाण्याचं मेलं आमचं भाग्य तरी कुठे आहे.

**आशा**—मला तर त्या जे. जे. कॉलेजमधल्या गोगटेचाच संशय येतोय. तो असाच आहे मेला मारोतीसारखा. रजूचं म्हणे प्रेम आहे त्याच्यावर.

**रजू**—माझं नाहीच प्रेम त्याच्यावर. तोच माझ्या सारखा मागे लागतो. परवा मला रस्त्यात भेटला तर म्हणतो कसा "तुमचं स्ट्रक्चर मस्त आहे." मी म्हटलं आता जातोस की तुझं फ्रॅक्चर करू? तसा गेला पळून. माकड मेला. मला किनई त्या सिद्धार्थ कॉलेजमधल्या वसंत प्रधानचा संशय येतो. उगाच गात असते त्याचे पोवाडे. नट आहे ना तो. तोच आला असेल मेला फॅन्सी ड्रेस करून मारोतीसारखा.

**उषा**—हट्. मी तर त्याच्याकडे बघतसुद्धा नाही. त्या दिवशी वाटेत भेटला. आणि म्हणतो कसा, "तुम्ही नाटकात फार छान काम करता" मी चप्पल हातात घेतली अन् म्हटलं मी रस्त्यात तमाशा देखील छान करते. दाखवू का करून? तसा गेला खाली मान घालून. मला वाटतं अॅकॅडमी ऑफ आर्किटेक्चरमधला हा कुंदाचा सुमाप कुळकर्णी असेल. अगदी त्याच्याच सारखा दिसतोय हा.

**कुंदा**—तो मुळी नाहीच हा. आपलं दुकान सोडून इथे कशाला येईल? बसला असेल दुकानात पुड्या बांधीत. वाणी मेला. खरं म्हणजे हा के. सी. कॉलेजमधल्या श्याम देशपांडेसारखा दिसतो अगदी. नीलाच्या म्हणे ओळखीचा आहे तो. आला असेल इथे लैला लैला करीत.

**नीला**—मी बोलतसुद्धा नाही त्याच्याशी. उगाचच येतो मेला पुढे पुढे करीत. त्या दिवशी भाऊच्या धक्क्यावर दिसला तर आला लगेच. अन् म्हणतो कसा "तुझ्याशी माझं लग्न झालं तर त्या सागरासारखाच माझा जीवनसागर शांत होईल." मी म्हटलं "मेल्या गळ्यात घागर बांधून जीव दे ह्या सागरात म्हणजे माझा जीवनसागर तरी शांत होईल." तसा गेला लॉंचमध्ये बसून. मालवणी मेला. ह्या मंदाचेच मुरके नडतात. दिसला एखादा तरुण की मार मुरका असं चालतं हिचं.

**मंदा**—हो हो! मी मुरके मारते बरं. आणि त्या मवाल्यांच्या वाटेला तरी कोण जाणार? आता परवाच बघ ना तो जयहिंद कॉलेजचा सविता देसाई












अनुक्रमणिका

लागला होता माझ्या मागे. म्हटलं जातोस की चप्पल हवी आहे. तसा म्हणतो कसा "बापाचं दुकान आहे वाटतं चपलेचं!" ही कुंदाच काही बोलत नाही त्यांना.

**कुंदा**–वा ग वा! मी पण बोलते की! कोण मेले त्यांचे टोमणे ऐकून घेणार. पण काय ग वाटेल ते बोलतात. त्या दिवशी एकाला, असंच म्हटलं, चप्पल हवे का? तर मेला म्हणतो कसा "नको. चपलेची मालकीण हवी आहे." ह्या आशामुळेच मेले येतात आपल्या कॉलेजभोवती घिरट्या घालायला. तिचा तो गडकरीं आहे ना पेट.

**आशा**–हो! मेल्याला उभा सुद्धा नाही करत मी कधी! त्या दिवशी मला म्हणाला "तुमचं नाव चौवळ, माझं नाव गडकरी. फक्त सीला गाठ मारली की की जी झाली. बघा बुवा तुम्ही गाठ मारायला तयार असाल तर..!" मी म्हटलं "मेल्या एकदा माझ्या दादाची तुझ्याशी गाठ घालून देते मग बघ." तेव्हा गेला पळून. वावळट मेला.

**उषा**–ए आता पुरे हं. तो जे. जे. मधला आहे की सिद्धार्थ मधला आहे की आणखी कुठला आहे ते आता आपण बघूचया.

**नीला**–ए मारोतीसारख्या दिसणाऱ्या माणसा, खरं सांग तू कोण आहेस?

**मंदा**–बघत काय बसलास, सांग ना? तू सिद्धार्थ कॉलेजमधला आहेस की जे. जे. स्कूलमधला विद्यार्थी आहेस? की आणखी कोणी....?

**मारोती**–मी कुठल्याच कॉलेजचा विद्यार्थी नाही. पण एम. व्ही. डी. एस. मध्ये जातो कधी तरी.

**सर्व**–एम. व्ही. डी. एस्. म्हणजे?

**मारोती**–तुमचं कसं एस्. एन्. डी. टी? तसं स्वर्गात एम्. व्ही. डी. एस्. आहे. म्हणजे मेनका-विश्वामित्र डान्सिग स्कूल.

**उषा**–अय्या ऽ ऽ तुम्ही मारोती ब्रह्मचारी न? मग डान्स स्कूलमध्ये कशाला जाता?

**मारोती**–अहो तुम्ही पृथ्वीवर निरनिराळे सिनेमा बघता. आम्हाला स्वर्गात नाच-नृत्य याशिवाय काय असणार करमणुकीसाठी.

**रजू**–मला किनई अजून संशय येतोय. काय वंडला मारतोय आजच्या तरुणासारखा.

**नीला**–अग पण आजचे तरुण काही एवढ्या तोकड्या चड्ड्या घालून फिरत नाहीत. ते फिटपॅण्ट वापरतात.

**आशा**–अय्या. खरंच की! तुम्ही मारोती म्हणता तर मग ही चड्डी कसली आहे हो तुमची.

**मारोती**–मुलीनो, ही चड्डी कसली आहे ते फक्त प्रभु रामचंद्रानीच ओळखलं अन् म्हणून तर त्यांचा मी जन्माचा सेवक झालो.

**मंदा**–परत तेच. हा तर स्वतःला मारोतीच समजतोय. हे बलवान् पुरुषा, अजून सांग आमच्यापैकी एखाद्या मुलीवर प्रेम बसून तू तिला भेटण्यासाठी तर आला नाहीस ना असा वेष बदलून?

**कुंदा**–असेल तसं तर सांग खरं. बघूया तरी कोण भाग्यवान आहे ती?

**मारोती**–राम, राम, राम! काय बोलता हे? मी आजन्म ब्रह्मचारी आहे.

**नीला**–बरं बाई, तुम्ही मारोती आहात असं एक तुमचं ध्यान बघून आम्ही मानलं; पण तुम्ही काही तरी चमत्कार दाखवून सिद्ध करा की.

**मारोती**–हो, हो, त्यात काय आहे? द्रोणागिरी पर्वतासारखं हे तुमचं कॉलेज हातावर उचलून दाखवू, की लंकेसारखी ह्या कॉलेजला आग लावू?

**कुंदा**–नको बाई आग बिग. माझं बी. एचं शेवटचं वर्ष आहे. एवढी डिग्री पड्दे हातात.

**मंदा**–तर काय. एस. एस. सी. होता होताच माझ्या नाकी नऊ आले होते.

**नीला**–नाही तर काय? एकदा बी. ए. झाल्यावर लग्न करायला तरी मोकळ्या होऊ.

**रजू**–मारोतीकाका, असं काही करू नका. ह्या कॉलेजवर किनई आम्हा सगळ्यांची भवितव्यं अवलंबून आहेत. तुम्ही किनई दुसरंच काही तरी करून दाखवा.

**मारोती**–बरं बरं, तुम्ही सगळ्या जवळ जवळ उभ्या रहा बघू.

(सर्व मुली जवळ जवळ उभ्या रहातात. मारोती शेपटी वाढवून सर्वांना शेपटीत गुंडाळतो. अन् शेपटी आवळतो.)

**नीला**–आई ग ऽ ऽ

**कुंदा**–देवा रे देवा.

**मंदा**–मेले मेले.

**रजू**–अरे रामा ऽ

**मारोती**–रामाचं नाव घेतलंत. मग सोडतो तुम्हाला.

**आशा**–छे. बाई. शेपटीतच एवढं बळ. तर हातात किती असेल नाही.

**रजू**–माझं किनई पातळ चुरगाळलं मेलं.

**मारोती**–काय पटली खात्री. की दुसरा एखादा चमत्कार दाखवू?

**कुंदा**–नको बाई. झालं तेवढं पुरे! आणखी पुढची स्टेप नको.

**मंदा**–पटली हो पटली खात्री. आहात बाई तुम्ही खरे मारोती.

**नीला**–आमच्या आजीला तरी आणायला पाहिजे होतं – दर्शनाला. शनिवारी उपवास करते बिचारी.

**उषा**–माझे पण वडील मारोतीभक्त आहेत. दर शनिवारी न चुकता देवळात जातात.

**आशा**–माझा भाऊपण मारोतीची तसबीर समोर ठेवूनच व्यायाम करतो. त्याला तरी फोन करून बोलवायला हवा होता.

**कुंदा**–अग जाऊ दे ग. आपण तरी मारोतीरायाचं दर्शन घेऊ, पूजा करू.

**मंदा**–हो ग. एवढा खरा देव दिसणार आहे कधी पुन्हा?

**रजू**–खाली किनई रुईचं झाड आहे. त्याची










पानं तरी आणू या तोडून माळ करायला.

**मंदा**–तर काय, मेली परीक्षा पण आलेय जवळ. चला वाई.

**कुंदा**–हे प्रभो मारोतीराया, आम्हा वाल-कांना क्षमा कर. आम्ही चुकून तुम्हाला नको नको ते वोललो.

**उषा**–हे वलभीमा, खरंच वाई आम्ही साप साप करून भूईच वडवीत वसलो.

**आशा**–हे अंजनीसुता, तुझ्या शक्तीची आम्हा अजाण वालकांना कल्पना नसल्यामुळे आमच्याकडून नको नको ते तुम्हाला ऐकावं लागलं.

**नीला**–हे वजरंगवली, आम्हाला क्षमा कर अन् आमच्या कडून थोडी तरी सेवा करून घे.

**मंदा**–वाई वाई वाई ! आता नारळ कुठून आणणार ? वलभीमाला नारळ तरी फोडला असता.

**कुंदा**–हो. म्हटले परीक्षेत तरी तुझा नारळ फुटेल.

**रजू**–हो वाई, हे मेले कॅन्टिनवाले नारळ का नाही ठेवीत विकायला कोण जाणे !

**उषा**–नारळ नाही तर नाही, सुंठवडा असता तरी वरं झालं असतं. सुंठवडा तर नाहीच पण मेला वटाटावडा सुद्धा चांगला मिळायचा नाही.

**आशा**–अय्या, आयडिया ! सुंठवड्याऐवजी वटाटावड्याचाच नैवेद्य दाखवू या का ?

**नीला**–मारोतीराया, नेवेद्याला, सुंठवड्या-ऐवजी वटाटावडाच चालेल का ?

**मारोती**–हो हो ! चालेल की. खरं म्हणजे मला अशी भूक लागलेय. अहो स्वर्गातून पृथ्वीवर यायचं उड्डाण करत म्हणजे काय खायचं काम आहे ? तुम्हा मानवाना चंद्रावर जाता जाताच नाकी नऊ आले. मी तर चंद्रकक्षा ओलांडून पृथ्वीवर आलो.

**मंदा**–अय्या, आम्ही मानव चंद्रावर उतरलो हे तुम्हाला कसं कळलं ?



**मारोती**–स्वर्गात प्रत्येक माणसाने काय केलं त्याची नोंद असते. तुम्ही नाही का चंद्रावर नोंदयंत्र ठेवलंय. तसं स्वर्गात चित्रगुप्ताकडे नोंदयंत्र आहे. पृथ्वीवरच्या पापपुण्याची नोंद हे यंत्र करतं.

**कुंदा**–वापरे ! म्हणजे वाटच लागली. ह्या तारुण्यात मेली काय काय पापं होतात आमच्या हातून.

**रजू**–तर काय वाई, एक पाप पचविण्यासाठी दुसरं करावं लागतं. लवकरच लग्न केलेलं वरं वाई.

**मारोती**–अहो पण लग्न केलेली माणसं पाप करत नाहीत म्हणून कुणी सांगितलं ? आणि तारुण्यात पाप घडतंच असं कुठे आहे ? मी नाही का ब्रह्मचारी आहे.

**उषा**–पण स्वर्गातून एवढं पृथ्वीवर येण्याचं कारण काय ? आणि अगदी ओरि-जनल वेषात ?

**मारोती**–तुम्ही मानवांनी चंद्रावर पाऊल ठेवल्यावर स्वर्गात फारच खळबळ उडाली. बऱ्याच दिवसांनी देवांवर भीतीची छाया पसरली. मागे राव-णाने नव्हती का स्वर्गावर स्वारी केली ? भस्मासुराने नव्हती का स्वर्गावर धडक मारली ? आणि कित्येक युगांनी यत्किंचित मानवाने चंद्रावर पाऊल ठेवलं.

**आशा**–वरं मग ?

**मारोती**–मग काय, स्वर्गात वरिष्ठ देव नेत्यांची तातडीची बैठक भरली. आणि चंद्रावर मानवाने पाय ठेवल्या-बद्दल निषेध व्यक्त करणारा ठराव







पास केला.

**नीला**–अय्या, तिथे पण राजकारणच चालतं की !

**मारोती**–मागे गणपतीने शाप दिल्यामुळे चंद्र इंद्राकडे येऊन चरणी लागला होता. आता मानवाने चंद्रावर पाय दिल्यामुळे चंद्राची प्रतिमा डागाळली गेली. चंद्रावरून मानव स्वर्गात पाऊल कशावरून ठेवणार नाही, या विचाराने देवांची झोप उडाली. आणि पृथ्वीवर वस्तुस्थिती काय आहे ते पाहण्यासाठी आमचे नारदमुनी आजारी असल्यामुळे मला पृथ्वीवर पाठविले.

**मंदा**–अहो पण तुम्ही भारतात कशाला आलात ? आम्ही काही चंद्रावर माणूस पाठवला नव्हता. आमच्या पंचवार्षिक योजनाच होता होता मारामार !

**मारोती**–अहो पण त्या नैवेद्याचं काय ?

**कुंदा**–अय्या ! खरंच की ! मग काय वटाटावडा चालेल ना ?

**मारोती**–खरं म्हणजे स्वर्गात सोमरस पिऊन अन् कंदमुळं खाऊन नको जीव झालाय. तुम्हा मानवासारखे रुचकर पदार्थ कोण देणार आम्हाला. वरं कुठेही प्रसाद म्हणून काय तर खोबरं अन् सुंठवडा. तो सुंठवडा खाऊन खाऊन माझ्या तर जिभेची चवच गेलेय. खरंच काही तरी छान पैकी नैवेद्य दाखवा मुलींनो.

**रजू**–दहिवडा चालेल ?

**कुंदा**–मेदुवडा आणू ?

**मंदा**–डाळवडा देऊ ?

**मारोती**–चालेल, चालेल. मेदुवडा आणा, वटाटावडा आणा, दहिवडा आणा. सगळे वडे आणा. पण काही तरी आणाच खायला.

**आशा**–ए, तुम्ही, सगळ्या थांबा इथेच. मी वेटरला ऑर्डर देऊन येते हं.

**रजू**–मी किनई खालून रुईची पाने घेऊन येते.

**उषा**–आशा, अग कँटिनमधून थोडं गोडंतेल पण घेऊन ये.

(आशा गोडंतेलाचा डबा अन् रजू रुईची पाने घेऊन येतात. त्यांच्या मागोमाग पोऱ्या डिशेस घेऊन येतो.)

**मंदा**–ए, एकेकीने थोडं थोडं गोडंतेल ओतू या. देवा, मारोतीराया अगदी देवासारखा उभा रहा बघ.

**कुंदा**–इश्य ! देवासारखा म्हणजे काय ग ? देवच आहेत की ते.

**नीला**–ए, मी आधी तेल ओतते हं.

**मारोती**–नको नको, गोडंतेल नका हो ओतू डोक्यावर! मुलींनो, तुम्ही डोक्याला तेल न लावणे ही फॅशन समजता. जरा जरी तेलकट चेहरा झाला की साबणाने तीनतीनदा धुता. स्नोचे अन् पावडरचे थरच्या थर चेहऱ्यावर चढवता. आणि मीच काय हो असं पाप केलंय की असा तेलकट चेहरा करून बसायचं ?

**उषा**–पण तुम्हाला गोडंतेल आवडतं ना ?

**मारोती**–कुणा मूर्खाने असं सांगितलंय कोण जाणे ! अहो सदोदित मी असा तेलकट राहिलो असतो तर माझ्या तेलकट हातावरून द्रोणागिरी घसरून नसता का पडला ?

**मंदा**–अय्या ! खरंच की !

**रजू**–आमची आजी सांगते शनिवारी मारोतीवर गोडंतेल ओतावं !

**मारोती**–तेल ओतावं नाही. तेल लावावं. तुम्ही मारे शकुंतला, ब्राह्मी, कॅस्टरॉइल वापरता आणि मला साधं खोबरेल पण नाही, तर गोडंतेल ओतता. कधी कधी ह्या देवपणाचा वीट यतो.

**कुंदा**–अय्या ! कमाल आहे बाई. वीट येतो म्हणे देवपणाचा.

**मारोती**–नाहीतर काय ? वर्षानुवर्षं तेच कपडे घालायचे. वर्षानुवर्षं एका हातात गदा अन् दुसऱ्या हातावर द्रोणागिरी अशा स्वरूपात उडणाऱ्या पोझमध्ये फोटो द्यायचे. अरे, जरा निराळी पोझ द्याल की नाही आम्हाला. तुम्ही कधी एकच पातळ नेसता ? तुम्ही कधी एकाच पोजमध्ये फोटो काढता ? उलट तीन रुपयात तीन निरनिराळ्या पोझेस् मिळतात म्हणे पृथ्वीवर !

**उषा**–बरं बाई. राहीलं. हे तेल नाही ओतत, नुसती रुईच्या पानांची माळ घालते. मग तर झालं ?

**मारोती**–नको. ती माळ देखील नको. डोक्यावर तेल ओतून सारे अंग तेलकट करायचे अन् गळयात ही माळ घालून चिकट करायचे, वा ! चांगलं आहे.

**आशा**–बरं. राहिलं. आम्ही फक्त नैवेद्य दाखवितो, आणि आरती करतो. मग तर झालं. ए, ऊषा, रजू, नीला, कुंदा, मंदा, चला आरतीला करा सुरवात.

**रजू**–इश्श ! मेली येतेय कुणाला आरती.

**कुंदा**–मंगळागौरीच्या आरतीशिवाय मला नाही दुसरी कसली आरती येत बाई.

**उषा**–मला साईबाबांची आरती येते.

**आशा**–अग, इथे काय सत्यसाईबाबा अवतरलेत की ह्या कुंदाची मंगळागौर आहे ? भलत्या वेळी भलतंच सुचतं तरी कसं तुम्हाला. मी करते सुरुवात. अग म्हणा की सत्राणे उड्डाणे ..! अग म्हणा की !

**उषा**–आम्ही नुसत्या टाळ्या वाजवतो. तूच म्हण की.

**आशा**–सत्राणे उड्डाणे ! छे बाई. तुम्ही कोणीच बोलत नाही. मग मी एकटीच कशी म्हणू ?

**मंदा**–जाऊदे ग, नाही ना येत तुला ? मग झालं तर !

**आशा**–नाही कशी ! येते नं. सत्राणे उड्डाणे . . . !

**मारोती**–थांबा, थांबा, मीच म्हणतो आरती. तुम्ही फक्त टाळ्या वाजवा.

**उषा**–अय्या ! तुमचीच आरती आणि तुम्हीच म्हणणार ?

**मारोती**–मग काय करणार. तुम्हाला येत नाही. पण माझी तर पाठ झालेय पुन्हा पुन्हा ऐकून. तीच तीच आरती ऐकून जीव नुसता गुदमरून जातो.









अहो, तीच तीच गांधीप्रार्थना लागली रेडिओवर रोज तर तुम्हाला नाही का कंटाळा येणार? मग आम्ही देवांनीसुद्धा तीच तीच आरती कितीदा ऐकायची?

**आशा**–बरं राहिलं. हा नुसता नेवेद्य. हे मारोती राया मी बटाटावड्याचा तुला नेवेद्य दाखवते. तो तू गोड मानून घे. अन् ह्यावर्षी तरी माझ्या लग्नाचं तेवढं जमू दे.

**कुंदा**–तर काय, विचारीला पाहून गेल्यावर पुन्हा म्हणून कोणी येत नाही. तर हे हनुमंता, मी हा डाळवड्याचा नेवेद्य दाखविते. ह्यावर्षी मला परीक्षेत पास कर.

**मंदा**–तर काय, विचारी गेली तीन वर्षे इंटरलाच आहे. त्याच त्याच विषयाचा अभ्यास तरी किती करायचा. तर हे बलभीमा मी हा मेदुवड्याचा नेवेद्य दाखवते. मला लवकरच नोकरी मिळू दे.

**रजू**–हो नं! बिचारीला इंटर व्हायला सुद्धा कोणी बोलवत नाही. माणसाने ॲप्लिकेशन तरी किती करायचे! हे अंजनीसुता, मी हा दहिवड्याचा नेवेद्य दाखवते. माझं किनई.... माझं किनई आमच्या शेजारच्या प्रमोदवर प्रेम आहे. तेवढी त्याच्या आईवडिलांची संमती मिळू दे लग्नाला.

**उषा**–हो बाई. माणसाने लग्नावाचून तरी किती दिवस रहायचं. हे बजरंगबली, मी नेवेद्याला भजी आणलीत. मला ह्यावर्षी नाटकात पहिलं बक्षिस मिळू दे.

**नीला**–इश्य! नाटकात तुला काम देतात हेच काय मुळी थोडं झालं. बरं पण हे रामदूता, मी हा वडासांभाऱ्याचा नेवेद्य दाखविते. माझी गोष्ट मासिकात छापून येऊ दे.

**आशा**–हो बाई! दर खेपेला साभार परत येतात हिच्या गोष्टी.

(मारोती खायला सुरवात करतो. तोच खाली रस्त्यावर गडबड सुरू होते. "अहो मारोती आला. अहो इथंच उतरला. जय बजरंग, जय हनुमान, अशा गर्जना करीत लोक येऊ लागतात." हातात तेलाच्या वाट्या, नारळ, रुईची पाने असतात.)

**मारोती**–रामा, रामा, मी आल्याची बातमी सगळीकडे पसरली वाटतं. बापरे तेलाचे बुधले, अन नारळ! नको नको हे सारं. मारोतीभक्तानो, नको हे मला.

असं म्हणत सर्व डिशेस तिथेच टाकून मारोती गच्चीकडे धावत सुटतो. "तो बघा मारोती, तो बघा बजरंग, जय हनुमान, जय बजरंग असं म्हणत लोक त्याच्या मागोमाग गच्चीवर येतात अन् जन्मल्यावर सूर्यावर ज्या वेगाने झेप घेतली त्याच वेगाने मारोती आकाशात उड्डाण करतो. (पडदा) ● ● ●

# कॅ | बे | रे

## नृत्य ? छे ! भारतीय सभ्यतेची कबर !





—लक्ष्मीदास बोरकर

सचिवालयावर अभूतपूर्व मोर्चा ! 'न भूतो न भविष्यति' असा मोर्चा. आतापर्यंत सचिवालयावर असंख्य मोर्चे गेले असतील. फाउंटनमधील वाहतूक वेगळ्या मार्गावरून वळविली जाते व सर्व व्यवहार सुरळीतपणे चालूच राहातात. परंतु, हा मोर्चा निघाला तर हाय कंबख्त ! मुंबापुरी शहरालाच 'हार्ट अॅटॅक' येईल. सगळ्यांचे 'हार्ट' बंद पडतील. दिल गायब होतील. 'दिल गया और दर्द लिया' अशी भयानक अवस्था होईल.

अर्धनग्न 'कॅबेरे डान्सर' रमणींचा मोर्चा सचिवालयावर निघतो. टॉपलेस उभार छात्या पाहून मॉबच्या छात्या धकधक करायला लागतील. धड लज्जा रक्षणार्थ असमर्थ असलेल्या त्या रंगीबेरंगी चिंध्या पाहून लोकांच्या दिलांच्या राई राईएवढ्या चिंधड्या उडतील. रमणींचा तो तंग पेहेराव पाहून शहरातील वातावरणच तंग बनेल. वाहतूकच नव्हे तर सारे व्यवहार बंद पडतील. हा मोर्चा सचिवालयावर जाऊन पोचण्यापूर्वीच कुणीही आदेश न देता 'मुंबई बंद' यशस्वी होईल.

'आम्हाला नाईट अलावन्स द्या', 'कॅबेरे डान्सर कर्मचाऱ्यांना वेतनश्रेणी लागू करा', 'जादा कामाबद्दल ओव्हरटाईम द्या' अशी घोषवाक्ये असलेले फलक हाती घेऊन कॅबेरे डान्सरनी सचिवालयावर मोर्चा नेला तर शहरात एकच धमाल उडेल की नाही ?

हा केवळ कल्पना–विलास समजू नका. कॅबेरे डान्सरची ट्रेड युनियन बनविण्याची भाषा ऐकू येते. त्यामुळे आपल्याच हयातीत, कुणी सांगावे, एक दिवस असाही येईल की, आज जे दृश्य पॉश हॉटेलच्या चार भिंतीआड पहावयास सापडते तेच दृश्य कदाचित् उद्या उघड्या रस्त्यावर आम जनतेला फुकटात बघायला मिळण्याचा संभव अशक्य नाही.

### कॅबेरे डान्स म्हणजे काय ?

'कॅबेरे डान्स' हा नृत्यप्रकार विदेशी. पाश्चात्य हॉटेलात नृत्याच्या नावाखाली जो नंगानाच, धुडगूस घातला जातो, उत्तान शरीराचे खुल्लम खुल्ला प्रदर्शन घडविले जाते त्या नृत्याला 'कॅबेरे डान्स' म्हणतात. अर्थात्, त्या नृत्य प्रकारातही कला असते. नृत्याचं शास्त्र असतं, तंत्र असतं असं म्हणतात. आपण भारतीय पाश्चात्यांचं अंध अनुकरण करण्यात पटाईत. परदेशी कॅबेरे डान्सचं लोण भारतात

तात आलं असल्यास नवल ते काय ? प्रमुख शहरातील पॉश हॉटेल-मध्ये बहुधा श्रीमंत मंडळी जात असते. त्यांच्या मनरंजनासाठी गोऱ्या कातडीच्या अर्धनग्न ललनांना भारतात आणून 'कॅब्रे डान्स'ची लज्जत लुटायची सोय केली जात असे. तथापि, १९६३-मध्ये परदेशी 'कॅब्रे डान्स' कलाकारांना भारतात आणून नाचविण्यावर सरकारने बंदी घातल्यापासून नाईट क्लबमधील करमणुकीसाठी 'स्थानिक' कलाकारांना वाव मिळू लागला. अर्थात्, 'कॅब्रे डान्स' मध्ये शिरकाव करण्याचा अग्रमान अँग्लो–इंडियन पोरींना मिळाला. अँग्लो–इंडियनची पितृदत्त संस्कृती लक्षात घेता त्यांना लज्जा कशाशी खातात हे माहीतच नाही. प्रथम 'कॅब्रे डान्स'मध्ये केवळ अँग्लो-इडियन तरुणींची मक्तेदारी होती. परंतु आता हळूहळू भारतातील विविध राज्यातील रमणींचे तिकडे लक्ष वेधले असून बंगाली, नेपाळी, तामिळी, पंजाबी वगैरे सर्व स्तरांतील उफाड्याच्या मुली स्वेच्छेने आपले वस्त्र फेडन घेण्यास पुढे सरसावल्या आहेत.

## दोन प्रकार

'कॅब्रे डान्स'मध्ये दोन प्रकार असतात. एक शुद्ध भारतीय नृत्याविष्कार असतो. कलकत्त्यातील ग्रेट ईस्टर्न हॉटेल व मुंबईतील ताजमहाल हॉटेल या दोन ठिकाणी व्यवस्थापक मंडळी भारतीय संस्कृतीची जोपासना करण्याचा आपल्या परीने प्रयत्न करीत असतात. कारण परदेशी पाहुण्याला भारतात आल्यावर करमणुकीसाठी खुद्द त्याच्याच देशातील नृत्य प्रकाराचे दुय्यम दर्जाचे अनुकरण पहावयास देण्याऐवजी भारतीय नृत्यप्रकाराचे दर्शन घडविणे श्रेयस्कर आहे असे त्यांना वाटते.

आपण कधी 'कॅब्रे डान्स' पाहिलात का ? निदान तो प्रकार कसा असतो याची काही कल्पना ? नाही ना ? ठीक आहे.

**बरोबर रात्री अकराच्या ठोक्याला शहरातील पॉश हॉटेले (यांनाच 'नाईट क्लब' म्हणतात) मधील लाईट्स मंद होतात. संगीत थांबतं. ड्रमवर विशिष्ट प्रकारची धडधड निर्माण करणारा आवाज काढला जातो. थोड्याच वेळात 'लेडीज अँड जंटलमन, आता कॅब्रे समय सुरू होत आहे' अशा अर्थाची घोषणा ऐकू येते. स्पॉटलाईटचा झगमग करणारा प्रकाशझोत पाडला जातो अन् उल्लूभाई मशालजींच्या नेत्रांचं पारणं फेडण्याचं सामर्थ्य असलेल्या धष्ट, पुष्ट अवयवाच्या नारीचं प्रक्षोभक नृत्य सुरू होतं. विविध उत्तान वेषात कामुकतेला आव्हान देणारे नृत्य पाश्चात्य संगीताच्या तालावर सुरू होतं. दोन डान्सर असल्या तर एकटी कॅब्रे नृत्य करते व दुसरी वस्त्रहरणाचा कार्यक्रम करते. संपूर्ण नग्न दर्शन देण्याची मुभा नसल्यानं जवळ जवळ नग्नावस्था होईपर्यंत ती आपल्या अंगावरची वस्त्रे फेडीत राहाते. प्रकरण एवढ्यावर थांबत नाही 'स्ट्रीप–टीज' प्रकारात 'स्ट्रीप' म्हणजे अंगावरचे कपडे काढून टाकणं आणि 'टीज' म्हणजे छेडछाड करणं अशा दोन्ही गोष्टींचा समावेश असतो.**

भारतीय कॅब्रे डान्स म्हणजे पाश्चात्य नृत्य अन् तमाशातील दौलतजादा याची मेसळ आहे. 'स्ट्रीप–टीज' हा प्रकार दौलतजाद्याची वाढविलेली आवृत्ती असते. दौलतजाद्यात 'या पावलीचं म्हणणं काय आहे' अगर 'नोटेचं म्हणणं काय आहे' असं विचारून तमासगीर नर्तिकेला देहावर ओणवं वाकायला लावून पैसे घ्यायला लावतात व स्पर्शसुख विकत घेतात. 'स्ट्रीप–टीज'मध्ये वस्त्रहरण (स्वतःच्या हातांनी) झाल्यानंतर मादकतेचा हा अॅटम बॉम्ब प्रेक्षक वर्गात जाऊन फुटतो. चोरटं स्पर्शसुख न देता ती अर्धनग्न नारी त्या अवस्थेत प्रेक्षकाच्या मांडीवरच जाऊन बसते. आपल्या हातांनी भरवते. याबद्दल तिला भरपेट बिदागी मिळते.

## दिव्याखालील अंधार

'कॅब्रे डान्स'च्या झगमग प्रकाशझोताखाली करुण आर्थिक परिस्थितीचा अंधार आहे हे किती जणांना माहीत आहे ? मादक, उत्तान व कामुक शृंगार करणाऱ्या या कामिनीच्या कामलीलांमागे कारुण्याची झालर दडलेली आहे याची आपणास कल्पना तरी आहे का ?

कुणी म्हणतील, स्वतःकडे लक्ष खेचून घेण्याची मनीची आकांक्षा हेच या उच्छृंखलतेचे कारण असेल. ते काही खरे कारण होऊ शकत नाही. भारतीय नारी–समाज अधोगतीला चाललाय अशी हाकाटी करून संस्कृती ऱ्हासाचे ढोल बडविण्याची गरज नाही. देहाचा उघडा बाजार करण्यासाठी फोरास रोडवरील धंदेवाईक वेश्यांप्रमाणे या उच्चभ्रू समाजातील मुली उद्युक्त कां होतात याचे कारण शोधण्यासाठी आपल्या आर्थिक परिस्थितीची तपासणी करणं आवश्यक आहे.

पैसा ! पैशाची गरज भागविण्यासाठी लाजलज्जा, सभ्यता, संस्कृती, संकोच साऱ्या काहीवर तिलांजली देऊन या मुलींवर शरीराचे प्रदर्शन करून रंगेल सधनांना रिझविण्याचा दुर्धर प्रसंग ओढवलेला असतो.

**शेरी** — या कॅब्रे डान्सरचं खरं नाव आहे पुतळी इराणी.



अनुक्रमणिका

ही मुंबईची राहाणारी. हाँगकाँगमधील एका दलालाशी सुदैवाने गाठ पडल्याने तिला युरोपात नृत्याचे कार्यक्रम मिळू शकले. तिचे जगभर कार्यक्रम झाले आहेत. तिला कॅबेरे डान्सर म्हणून आंतरराष्ट्रीय कीर्ती लाभली आहे. पुतळी हे कार्यक्रम करून आपल्या कुटुंबाचे पोषण करते. पुतळीच्या पावलावर पाऊल ठेवून किती तरी भारतीय मुली या क्षेत्रात प्रवेश करीत आहेत.

**संयुक्ता** — तिचं खरं नाव आहे सीप्रा सेन. ही मुलगी बंगाली. तिचं एका मुलावर प्रेम होतं. त्या मुलाने लग्नाच्या दिवशी तिला दगा दिल्यामुळं तीनं आपणास कॅबेरे डान्सच्या कर्दमात लोटून दिलं. तिच्या या नोकरीच्या परिणामांची तिच्या कर्मठ व वयस्क मातेला मुळीच कल्पना नाही. सीप्रा सांगते, "माझ्या आईला एवढंच माहीत आहे की मी नाचते." पहिल्या प्रथम अंगावरचे कपडे काढून जवळजवळ नग्नावस्थेत लोकांसमोर उभं राहाण्याच्या कल्पनेनं तिच्या अंगावर शहारे आले. परंतु, मागाहून तिच्या विचारात बदल होऊन शरीराचं प्रदर्शन करणं अंगवळणी पडलं. सीप्रा सेन 'दीपेर नाम तियाराम' या बंगाली चित्रपटात चमकली असून प्रकाशनाच्या मार्गावर असलेल्या 'अकाल वसन्ता' या बंगाली चित्रपटात तिने वेश्येची भूमिका वठविली आहे.

**शेफाली** — ही आणखी एक बंगाली कॅबेरे डान्सर. तिचं नाव आहे आरती दास. तिचं नृत्य पाहून कलकत्त्यातील एका हॉटेलवाल्याने तिला कॅबेरेमध्ये जाण्याबद्दल सुचविलं. आरतीला पैशांची अतिशय गरज होती. तिने तात्काळ सूचना मंजूर केली व कॅबेरेच्या रंगेल दुनियेत प्रवेश केला. तिचे वडील वृद्ध झाले असून दुकान चालविण्याची ताकद त्यांच्यात राहिलेली नाही. तिच्या उत्पन्नावरच तिचे आई, वडील व भाऊ जगतात. तिचं शिक्षण बेताचंच असल्यानं अन्य चांगली नोकरी मिळविण्याचा प्रश्नच उद्‌भवत नव्हता. ती बंगाली शाळेत थोडंफार शिकली आहे. इंग्रजी बेतासबात बोलायला येतं. अशा स्थितीत आपल्या सर्व कुटुंबियांच्या दैनंदिन गरजा भागविण्यासाठी तिला अन्य नोकरी मिळण्याची शक्यता नव्हती. आरतीला भारतीय नृत्य शिकायला आवडलं असतं. परंतु ते नृत्य शिकायला बराच पैसा खर्च करायला पाहिजे आणि शिकल्यावरसुद्धा कॅबेरेच्या निम्म्यानेही पैसा मिळत नाही असे तिचं म्हणणं.

**जॉर्जीना** — ही आणखी एक बंगाली कॅबेरे डान्सर. तसेच **सलोमे** ही पण बंगाली. **मीना राय** ही नेपाळी. दार्जिलिंगजवळच्या लेबाँग या मागासलेल्या गावातून ही मुंबईच्या 'रिट्झ' या आलिशान हॉटेलात येऊन थडकली आहे. पदराला शिक्षणाचा गंध नाही. इंग्रजीचं रटफ येत नाही. तिच्यावर वृद्ध आईबाप व शाळेत जाणारी सहा बहिणभावंडं एवढ्यांना पोसण्याची जबाबदारी. तिनं कलकत्त्यातील रंगभूमीवर भारतीय नृत्यांना सुरवात केली. पण त्यातून अन्न, भाडं व शाळेची फी भागण्यापुरते पैसे सुटत नव्हते. शेवटी हताश होऊन मीना कॅबेरेकडे वळली. आता तिनं नाव कमावलं आहे. परंतु कुटुंबियांचा उदरनिर्वाह करण्याचं कर्तव्य व जबाबदारी यातून मुक्त होताक्षणी या कॅबेरे डान्सला रामराम ठोकण्याची तिची इच्छा आहे. मीनाची आई सर्वत्र तिच्याबरोबर सावलीसारखी असते. पण तिने मीनाला नाचताना कधी पाहिलेलं नाही. 'आई नसताना मी नृत्याची प्रॅक्टिस करते. काही झालं तरी ती माझी जन्मदात्री आहे' असं मीना म्हणते.

**सलोमे** — तिचं नाव आहे अनुराधा गुहा. प्रसिद्ध सिनेतारका अनिता गुहा ही तिची बहीण. कॅबेरे हा घराण्याच्या नावाला चिकटलेला कलंक आहे असे अनिताला वाटतं. तथापि, आपल्या मातेचा उदरनिर्वाह व दोन पुतणींच्या शिक्षणाचा खर्च प्रामुख्याने अनुराधा करते. 'याचा अर्थ असा की, मला काही काळ तरी नाचतच राहावं लागल' असं अनुराधाचं म्हणणं. अनुराधा मॅट्रिकपर्यंत शिकली आहे. इंडियन एअरलाईन्समध्ये हवाईसुंदरी म्हणून तिने प्रथम व्यवसायाला प्रारंभ केला. तिच्या इंग्लीश नातेवाईक स्त्रीने अनुराधेला कॅबेरे नृत्यात भाग घेण्यास प्रवृत्त केलं. कारण त्या इंग्लीश स्त्रीला कॅबेरेचा अनुभव होता. प्रथम अनुराधेच्या आईनं तीव्र विरोध केला. परंतु, जादा पैशांची गरज होती आणि नृत्य व स्ट्रीपींग (वस्त्रहरण) केल्याने तो पैसा मिळत होता. वर्षाभरात अनुराधा दोन हजार रुपये कमावू लागली व तिच्या आईचं मत बदललं. ती म्हणू लागली, 'कॅबेरे फारच छान आहे. माहीममधील टेलरच्या दुकानात अनुराधला सलोमे हे नाव सापडलं. ते बायबलमधील नाव आहे हे तिला मागाहून केव्हातरी समजलं.

**गिझेला**चा नवरा आहे हैद्राबादी. तिच्याशी लग्न केल्यामुळे त्याची स्वतःच्या कुटुंबियाशी फारकत झाली. कारण गिझेला आहे जन्माने अँग्लो इंडियन. सेक्रेटरीची नोकरी सोडायला लावून नवऱ्यानेच तिला नाईट क्लबमध्ये नाचायला भाग पाडलं. व्यापार सुरू करता यावा म्हणून भांडवल जमविणं हा त्यामागील उद्देश. हे भांडवल कधी जमतं अन् आपण या धंद्यातून कधी मोकळी होते त्या दिवसाची गिझेला उत्कंठेने वाट पहात आहे.

डॉनला एक लहान मुलगी आहे. तिला उत्तम प्रकारे वाढविण्यासाठी तिला पैसा हवा आहे. डान्सर म्हणून पैसा कमाविण्यामागील तिचा उद्देश तोच आहे. तिचा नवराही यात्र धंद्यात आहे. डॉन अगदी दारिद्र्यात वाढली. सहा इयत्तापलिकडे तिच्या शिक्षणाची मजल जाऊ शकली नाही.

**वॅप्सी**—इंजिनियरची काम करण्याची शक्ती अचाट आहे. तिचे वडील कधीच दिवंगत झाले व सबंध कुटुंबाचा भार तिच्यावर येऊन पडला आहे. त्याच्यासाठी हातपाय हलविणं तिला भाग आहे. दिवसा वॅप्सी एका ड्रग फर्म (औषधांची कंपनी) मध्ये पॅकर म्हणून काम करते आणि रात्र पडल्यावर ती नृत्यांगना बनते. डिव्हाईन जोन्सची तऱ्हा काही अंशी तिच्यासारखीच आहे. दिवसा जोन्स एका उद्योगसमूहातील सर्वोच्च अधिकाऱ्याची प्रायव्हेट सेक्रेटरी म्हणून काम पहाते आणि रात्रीची जोन्सची डेझिरी बनते व कलकत्त्याच्या लिडो रूममध्ये अवयवांचे उत्तान नृत्य करून दाखवून पैसा कमावते.

आणखी अशीच एक नृत्यांगना आहे. तिने शालेय शिक्षण मुळीच पुरं केलेलं नाही. ती म्हणते, 'मला हिंदीत नेहमी भोपळा मिळायचा!' ती दिसायला सुरेख आहे. तिचा बांधा रेखीव आहे. हेच तिचं भांडवल. आज ती वस्त्रहरणाचा कार्यक्रम करून दाखवून प्रेक्षकांना भुरळ पाडते. तिच्या बापाने नोकरी कधीच सोडून दिली आहे. मुलीला कॅबेरे नृत्यापासून अन् शरीरविक्रयापासून मिळणाऱ्या पैशावर तो जगत असतो.

## काही निष्कर्ष

कॅबेरे डान्स करून पोट जाळणाऱ्या अनेक तरुणींचा आपण परिचय करून घेतलात. त्यावरून आपणास काय वाटलं? त्या स्वखुषीनं केवळ मजेखातर नग्न देहाचं प्रदर्शन करतात? छे. छे. त्यांची आर्थिक परिस्थितीच त्यांना वळजवरीनं त्या खाईत लोटीत असते. बहुतेक कॅबेरे डान्सरच्या परिस्थितीचं वस्तुनिष्ठ पृथःकरण करून पाहिलं तर आपणास पुढील काही निष्कर्ष काढावे लागतील:

(१) बहुतेक सर्व तरुणी शालेय शिक्षणाचा उंबरठा ओलांडू शकलेल्या नाहीत.
(२) त्या अतिशय संकुचित मनाच्या आहेत.
(३) बहुतेक परिस्थितीनं अडलेल्या, गरजू आहेत.
(४) त्या अत्यंत हुशार आहेत. क्रूर व स्वार्थी जगाविरुद्ध सामना देण्यासाठी सर्व शक्ती वेचीत आहेत

यापैकी एकही नृत्यांगना आवड म्हणून या पेशात शिरलेली नाही. त्या म्हणतात, "नृत्यावर आपलं प्रेम आहे. नृत्य आपल्या रक्तातच आहे." तथापि, सर्वजणी थोड्याच वेळात कबुली देतात की, हॉटेलमधील खोल्यातलं हे जिप्सी पद्धतीचं जीवन व कपडे घालणं अन् फेडणं या दुष्ट चक्रातून आपली कधी काळी मुक्तता होईल या आशेवर आपण प्रतीक्षा करीत आहोत. काही जणी तर उघडपणं या जीवनाविषयीची किळस बोलून दाखवितात. रोज रात्रीच्या वेळी वखवखलेल्या, विषारी नजरेच्या व असभ्य प्रेक्षकांसमोर उभे राहून व उसने हास्य चेहऱ्यावर आणून नृत्याविष्कार घडविण्यासाठी केवढी किंमत मोजावी लागते, कोणत्या भयंकर दिव्यातून जावे लागते याची त्यांना पूर्ण जाणीव आहे.

अनेक तरुणींना या दिव्यातून जाण्यासाठी मनाची तयारी करण्याकरिता मद्य प्राशन करावं लागतं. मदिरेच्या नशेत मदिराक्षी बेभानपणे देहाची तमा न बाळगता नाचून जमावाला बेभान करू शकते.

या कॅबेरे डान्सरचं मुख्य भांडवल म्हणजे त्यंचं शरीर. अन् केवळ पैशासाठी ते लोकांच्या समोर उघडं करून दाखवावं लागतं. भारतीय हॉटेलमधील कॅबेरे कलाकाराला दरमहा दोन हजार रुपयापर्यंत कमाई करता येते. साधारणतः कॅबेरे डान्सर ५०० ते ८०० रुपयांनी सुरुवात करते. काही याहून कमी रक्कम घेतात. भारतीय कॅबेरे कलाकाराच्या दोन श्रेणींपैकी 'स्ट्रीप-टीज' करणाऱ्याला सर्वात अधिक बिदागी मिळते. स्ट्रीप-टीजला प्रेक्षकांकडून वाढती मागणी असल्यानं हॉटेल व्यवस्थापक पैशाचं आमीष दाखवून अधिकाधिक तरुणींना लाजलज्जा गुंडाळून वस्त्रहरणासाठी प्रवृत्त करताना आढळतात.

## स्ट्रीप-मारक नृत्य

स्ट्रीपचा प्रकार भारतीय कॅबेरे नृत्याला मुळीच पूरक ठरत नाही. कारण ज्या मुलींजवळ नग्नावस्थेत प्रेक्षकांसमोर उभे राहाण्याची हिंमत आहे पण ज्यांच्यापाशी कलेचा मागमूसदेखील नाही अशाच मुली या नृत्यात चमकतात व खऱ्याखुऱ्या कलाकारांना त्या मागे टाकतात. विशेषतः स्ट्रीप (वस्त्रहरण) प्रकारामुळंच समाजाचं लक्ष कॅबेरे डान्सकडे वेधलं गेलं अन् अशा या बीभत्स नृत्यप्रकारावर बंदी घालण्यात यावी अशी ओरड सुरू झाली आहे. सरकारनंसुद्धा या नृत्यप्रकाराची दखल घेतली असून स्ट्रीप नृत्यावर कशी काय बंदी घालायची यावर गृहखाते व पोलिस विचार करीत आहेत.

कॅबेरे डान्सरना मिळणारा बेफाम पैसा तेवढा लोकांना दिसतो. या व्यवसायासाठी त्यांना करावा लागणारा खर्च कुणालाही दिसत नाही. जसा बेफाम पैसा मिळतो तसा भरमसाट खर्चही करावा लागतो. पेहरावावरील खर्च हा त्यांच्या पगारातला बराच मोठा हिस्सा खाऊन जातो. चांगल्या पेहेरावासाठी ५०० रुपयापेक्षा कमी खर्च येत नाही. ट्रिमींग आयात करावी लागतात. पायांना चढवायच्या जाळ्या व स्टॉकींग फार काळ टिकत नाहीत. ती नवीन विकत घेणं तेवढंच अवघड असतं. शहामृगाची पिसं मिळविणं ही अशक्य कोटीतील बाब आहे. त्यात विग (केसाचा टोप) व सौंदर्य प्रसाधने याच्या खर्चाची भर. (एका एका विगची किंमत दिडशे ते दोनशे रुपये असते.) मेकअपवर भरमसाट खर्च करावा लागतो. फोटोग्राफ हा कायमचा खर्च असतो. कारण कॉंट्रॅक्ट संपल्यानंतर व्यवस्थापक फोटो परत करतातच असं सांगता येत नाही. संगीताची व्यवस्था करावी लागते. लोकप्रिय संगीत ऐकविण्यासाठी प्रत्येक घडीला ७५ रुपये मोजावे लागतात. प्रत्येक कलाकाराप्रमाणे खर्च बदलत असतो. त्यांच्या उत्पन्नावर कर आकारला जातो व त्यासाठी निराळा पैसा कुणी त्यांना देत नाही.

अनुक्रमणिका

परदेशी कलाकारांवरील बंदीमुळे निर्माण झालेली पोकळी भरून काढण्याची कामगिरी स्थानिक कॅबेरे डान्सरनी करावी अशी सरकारची अपेक्षा असेल तर त्यांना लागणारी प्रसाधने व अन्य साधने यांच्या आयातीवरील निर्बंध शिथील केले पाहिजेत. तसेच भारतीय कॅबेरे कलाकारांना अधूनमधून परदेशातील कलाकारांचे नृत्यकौशल्य व सफाई यांचे निरीक्षण करण्यासाठी परदेशात पाठविण्याची सोय केली पाहिज.

## प्रशिक्षणाची सोय करा

कॅबेरे डॉन्सर या अप्रत्यक्षपणे परकी चलन मिळवून देणाऱ्या कलाकार असल्याने या कलाकारांच्या प्रशिक्षणासाठी सरकारने मदत केली पाहिजे. अशा प्रशिक्षण केंद्रांतून कॅबेरे कलाकारांना पद्धतशीर नृत्य शिक्षण देण्याची सोय झाली पाहिजे, परंतु भारतात कॅबेरे कलाकारांना प्रशिक्षण देणारी एकही शाळा नाही. अनेकांनी वैयक्तिक प्रयत्न चालविले आहेत. त्यात प्रामुख्याने परदेशी कलाकार आहेत. परंतु त्यांच्या नृत्यशाळांना पैशांच्या अडचणीपायी गाशा गुंडाळावा लागला अगर पोलिसांनी सार्वजनिक नीतीमत्तेला बाधा येते या कारणाखाली बंद करण्यास भाग पाडलं आहे. सर्व कॅबेरे डॉन्सर आपण होऊन नृत्य शिकल्या आहेत. उपजत बुद्धीने येईल तसं अगर अनुकरण करून त्या नाचतात.

पुरवठ्यापेक्षा कॅबेरे डॉन्सरना मागणी अधिक आहे. त्यामुळे या डान्सर जेथे अधिक पैसा मिळतो तेथे जातात. प्रत्येक वेळी त्यांना निराळा कॉंट्रॅक्ट करावा लागतो.

जवळजवळ नग्नावस्थेत जेथे व्यवसाय करावा लागतो अशा या व्यवसायात कोणत्याही कलाकाराचे चारित्र्य धवल असेल अशी अपेक्षा करण्यात अर्थ नाही. हा अनैतिक मार्गाने उदरनिर्वाह करणारा व्यवसाय आहे. त्यामुळे सामान्य नीतीमत्तेच्या कसोटचा येथे लागू करता येणार नाहीत. कॅबेरे नृत्य करणाऱ्या कलाकारांचं जीवन जलद गतीनं जातं. रात्रीचा काळोख पडल्यावर त्यांना काम करावं लागतं व लोकांचा दिवसभराचा शिणवटा दूर करावा लागतो. यापैकी ६५ टक्के कलाकार रोख पैसे घेऊन शरीरविक्रय करतात. काही मुली नृत्य करतात व घरी जाऊन एकटचा झोपतात.

भारतात कॅबेरे नृत्य प्रकार इतर देशाच्या मानाने बराच मागं आहे. आंतरराष्ट्रीय दर्जा प्राप्त होण्यासाठी कलाकार, व्यवस्थापक व सरकार अशा तिघांकडून प्रयत्न होणे जरूरीचं आहे.

कॅबेरे नृत्याला दर्जा प्राप्त होवो अगर न होवो; परंतु, कॅबेरे कलाकाराच्या बाबतीत समाजाने मानवतावादी दृष्टीकोन बाळगला पाहिजे. कारण त्यांचं व्यावसायिक जीवन अल्पायुषी असतं. फार तर वयाच्या पस्तीशीपर्यंत चालतं. ज्योतीवर घिरटचा घालणाऱ्या रंगीबेरंगी पतंगाप्रमाणं ते क्षणमात्र डोळे दिपवून सोडतं अन् लगेच नजरेआड होतं. कॅबेरे कलाकार हे जीवन अशासाठी निवडतात की त्याच्यावर नातेवाईक अवलंबून असतात. त्यांना जगविण्यासाठी त्यांना पैसा हवा असतो. अन्य मार्गाने त्यांना असा पैसा मिळण्याची शक्यता नसते.म्हणून त्या जाणूनबुजून या कर्दमात आत्मार्पण करतात. कॅबेरे कलाकाराच्या देहाचं प्रदर्शन थांबलं पाहिजे असा नुसता कंठशोष करून काहीएक होणार नाही. ते अरण्यरुदन ठरेल. जोपर्यंत सामाजिक घडी बदलत नाही, आर्थिक परिस्थितीत सुधारणा होत नाही तोपर्यंत हे असंच चालणार आहे.उत्तान शृंगाराबद्दल त्या बिचाऱ्या कॅबेरे कलाकारांना दोषी धरण्यापेक्षा भारतात भारतीय सभ्यतेची कबर बांधू पहाणाऱ्या ढोंगी, ऐदी, ऐतखाऊ व वखवखलेल्या समाजबांधवाना खडसून जाब विचारा. जोपर्यंत आपल्या समाजात पैशाच्या जोरावर सुदृढ व सुंदर स्त्रियांची वस्त्रे फेडण्यास टपलेले दुःशासन आहेत तोपर्यंत नाईट क्लबमध्ये वस्त्रहरणाचा कार्यक्रम राजरोसपणे चालत राहाणार यात शंकाच नाही. ● ● ●

---

( पृष्ठ १० वरून --**आचार्य अत्रे** )

जनार्दनाचा दिवाण-ई-आम असे तर तो कधी निवडक व निकटवर्ती लोकांचा तर कधी व्यसनेषु सख्यम् या नियमानुसार भरलेला दिवाण-ई-खास असे. आणि कधी कधी खंडाळचाला 'राजमाची'वर आकाशमंडप आणि पृथ्वी आसन करून, वृक्षवल्लरी, डोंगर, ढग या सोयऱ्यांसमवेत अत्रे कालक्रमणा करीत आणि अशा उंबराच्या फुलाप्रमाणे दुर्मिळ असणाऱ्या एकांताच्या वासात अत्रे मनाचा संवाद साधीत. पहिल्या दोन दरबारांचे शहेनशहा अर्थातच प्रल्हाद केशव अत्रे असत. पण 'राजमाची'ला निसर्गरूप परमेश्वरापुढे काही काळ का होईना पण अत्र्यांच्या आत्मकेंद्रित वृत्तीची आणि मुंबईत असताना रात्रंदिन जो त्यांचा युद्धाचा प्रसंग चाले त्याची जीर्ण वस्त्रे गळून पडत असावीत असे वाटते.

अत्र्यांचा हा दरबार अठरा पगड जातींचा व व्यक्तीगणिक वेगळचा असणाऱ्या वृत्तींच्या लोकांना मोकळा होता. येथे राव आणि रंक, स्त्री आणि पुरुष, वृद्ध आणि तरुण असा अमंगळ भेद नव्हता. अत्रे सर्वांचे मोठचा मानाने व मोठचा आवाजाने स्वागत करीत. सगळा वेळ बोलाचीच कढी बोलाचाच भात हा बेत असे. (अत्र्यांचा पाहुणचार वेगळा, तो पुणेरी नव्हता, वऱ्हाडी होता) पण त्याचेच सेवन करून प्रत्येकजण तृप्त होतसाता, समाधानाची ढेकर देत परत जात असे. काही मुंगीवादी उद्योगी लोकांना अत्र्यांचा हा तोंडाची वाफ व बहुमोल वेळ दवडण्याचा निरुद्योग साफ नामंजूर होता. निषेधाची नोंद ते कधी कधी करीत. अत्रे हसून म्हणत, "अहो, हे तर माझ्या वाङमय-व्यापाराचे मुख्य भांडवल आहे. मी शेकडो माणसे बघतो, ऐकतो, त्यांची सुखदुःखे, आशा-आकांक्षा, त्यांच्यावर होणारा अन्याय यामधून मला मानवी स्वभावाचे अद्भुतरम्य दर्शन घडते तेच लिहितो. अत्र्यांच्याकडे रोज येणारी ही माणसे म्हणजे अत्र्यांच्या प्रचंड वाङमयीन जलसंचयाच्या खालील जिवंत झरे होते. यामुळे अत्र्यांचे वाङमय वाचताना अनेक ओळखीचे चेहेरे कधी हसत, कधी आक्रोश करीत तर कधी त्वेषाने आपल्यासमोर उभे रहात. अत्रे केवळ धंदेवाईक दृष्टीने आणि केवळ एक साधन म्हणून या मानवी समुदायाकडे बघत नव्हते. अत्र्यांच्यात असणाऱ्या लेखकाइतकाच अशावेळी त्यांच्यातील माणूस जागृत असे हे आवर्जून सांगितले पाहिजे. त्यांचे कान कथा ऐकत असत, त्यांची स्मरणशक्ती महत्त्वाच्या








आशयाचा संग्रह करीत असे, त्यांची प्रतिमा त्यातील नाट्य व सौंदर्य यांचा वेध घेत असे पण त्याचबरोबर अत्र्यांचे बलदंड हात समोर असणाऱ्या माणसाच्या डोळ्यातील तरळणारी आसवे पुसण्यास सदैव सज्ज असत.

अत्र्यांना माणसांप्रमाणेच उत्कटाचा आणि भव्याचा हव्यास होता. त्यांना प्रत्येक गोष्ट प्रचंड लागे. यामुळेच अत्र्यांनी आपल्या नातवंडांची नावे भारदस्त व ऐसपैस ठेवली होती. एकाचे नाव राजेंद्रप्रसाद तर दुसऱ्याचे विक्रमादित्य. अशी लांबलचक नावे कां ठेवलीत अशी कोणी पृच्छा केली की अत्रे उत्तर देत या पोरांचे आडनाव आहे पै म्हणून नाव मोठे ठेवले. अत्र्यांना बहुधा शेक्स्पियरचे नावात काय आहे हे मत मान्य नसावे. 'कऱ्हेच्या पाण्या'त पूर्वी लिहिलेल्या लेखांच्या व दिलेल्या भाषणांच्या प्रतिवृत्तांची कात्रणेच फार आहेत. स्वतंत्र व नवीन लेखन थोडे फार आढळते ते पहिल्या खंडात. पण अत्रे आतील मजकुराच्या आशयापेक्षा आपल्या आत्मचरित्राच्या प्रचंड आकारावरच खूष असत. चंद्रावर मानवाने पदार्पण केले त्यावेळी पहिली आठवण अत्र्यांची झाली. मराठ्याचा खास अंकच निघाला असता. आणि त्यातील अत्र्यांनी लिहिलेला अग्रलेख म्हणजे एक महाकाव्यच झाले असते.

अत्र्यांना 'लेखकू' ही संस्था मान्य होती कारण अनेकदा ते आपले लेख तोंडाने सांगत. पण कोणी आपला लेख म्हणा, कविता म्हणा, कथा म्हणा किंवा नाटक म्हणा वाचून दाखवतो असे म्हटले की अत्रे ती कलाकृती हिसकावून घेत व भराभर वाचून संपवीत. भराभर म्हणजे घाईने किंवा निष्काळजीपणे नव्हे. लेखनाचा तसाच वाचनाचा त्यांचा झपाटा दांडगा होता. त्यांच्या दृष्टीतून मुद्याचे एकही वाक्य सुटत नसे. माझे अक्षर नवकाव्यापेक्षाही दुर्बोध असल्यामुळे वाचता कशाला वाचून दाखवतो असे मी विनयाने म्हणत असे. पण अत्रे हे मूळ हाडाचे मास्तर असल्यामुळे माझे अक्षर ते लावीत आणि मजकूर वाचत. पण माझ्या लेखनाला 'वाङ्मय' होऊ देत नसत. अत्र्यांना मात्र आपले लेखन वाचून दाखविण्याची मोठी हौस होती. एखादी प्रेमळ आई आपल्या गोंडस आणि गोऱ्यापान मुलाचे लाड व कौतुक करते व इतरांनी तसेच करावे अशी जशी तिची अपेक्षा असते त्याप्रमाणे नाटक, लेख किंवा कथा यातील उतारे वाचून दाखविताना अत्र्यांच्या मुखावर आविर्भाव असे. दाद दिली की अत्रे बेहद्द खूष असत. या बाबतीत 'द्या उत्तजन हो कवीस न करा गाण तयाचे मुके' ही केशवसुतांची विनंती केशवकुमारांनाही पूर्णपणे मान्य होती. कोणत्याही कलावंताच्या सृजनशील शक्तीच्या आविष्काराचा वेल जो गगनावरी जाऊन पोचतो त्याचे एक कारण रसिकाकडून मिळणारे उत्तजनाचे खतपाणी. अत्रे याला अपवाद नव्हते. कोणीही चांगला लेख लिहिला, नाटक लिहिले, भाषण केले, कोणाचे चांगले गायन ऐकले, कोणी चांगली कुस्ती मारली, कोणी क्रिकेटची मॅच जिंकली की अत्रे हातचे काहीही राखून न ठेवता मुक्तकंठाने त्याची स्तुती करीत. एकदा डॉ. जयकरांचे भाषण झाले. सभेस हजर असलेल्या अत्र्यांनी भाषणाची प्रशंसा केली. जवळच



मेसर्स टॉम अ‍ॅण्ड बे या जाहिरात कंपनीचे मॅनेजिंग डायरेक्टर श्री. गणेशराव तांबे हे गेल्या दि. ७ ऑगस्टला जागतिक दौऱ्यावर विमानाने रवाना झाले त्यावेळी-(डावीकडून) श्री. दीनानाथ दलाल, श्री. गणेशराव तांबे आणि श्री. श्रीकृष्ण देवकुळे.

'केसरी'चे संपादक ज. स. करंदीकर उभे होते. ते म्हणाले, 'अहो, बाबासाहेबांचे अभिनंदन कसले करता ? आता ते शाबासकीच्या पलीकडे गेले आहेत.' "साफ चूक आहे. कोणताही कलावंत रसिकांची प्रतिक्रिया कळण्यासाठी नेहेमीच उत्सुक असतो." जयकरांनी सस्मित मुद्रेने अत्र्यांच्या विधानाला संमती दिली. खुद्द अत्रे या बाबतीत फार संवेदनाक्षम होते. वाचक किंवा प्रेक्षक लहान असो मोठा असो, अधिकारी असो त्याचे मत ऐकण्यास ते फार उत्सुक असत. अत्रे आमच्या घरी आले की "अमुक नाटक आवडले का ? अमुक लेख वाचला का ?" असे ते केवळ माझ्या वडिलांनाच विचारीत नसत तर आजीचाही अभिप्राय ते मुद्दाम विचारीत. या सगळ्यात थोडा फार स्तुतीप्रियतेचा भाग होता, नाही असे नाही पण त्याबरोबरच वाचकांना किंवा श्रोत्यांना काय वाटते ही कोणत्याही कलावंताला सदैव छळणारी जिज्ञासा अत्र्यांच्यात उत्कटतेने होती. अत्रे आणखी एक प्रश्न नेहमी विचारीत, 'मी लिहितो ते तुम्हाला सर्व कळले का ?' आपले लेखन सुबोध असावे म्हणून अत्रे सारखा विचार करीत असत आणि कष्ट करीत असत.

## नवकवितेवर अनावर राग

प्रतिभेची दोन प्रमुख लक्षणे म्हणजे निर्माणक्षमता व विवेचनक्षमता. अत्र्यांच्याजवळ विवेचनशक्तीचे भांडवल फार बेताचे होते. एखादे पुस्तक किंवा लेख वाचून अत्र्यांचे जे मत बनत असे ते अचूक असे. अतिशयोक्तीमुळे अत्र्यांची निर्दोष मतेही कित्येकदा एकांगी किंवा बालिश वाटत असत. नवकाव्यावरील आणि अश्लीलतेवरील अत्र्यांचे हल्ले हे त्यांच्या निरोगीवृत्तीचे आणि रसिकतेचे द्योतक होते. तसेच अत्रे हे पहिल्या प्रतीचे विनोद पंडित असल्याने लेखकाचा तोल गेला आणि औचित्यहानी झाली किंवा अभिप्रेत असणारा आशय यथार्थ शब्दात व्यक्त करता आला नाही की ते अत्र्यांना सहन होत नसे. यामुळे अत्र्यांनी रविकिरण मंडळातील कळपवादी कवींपासून ते थेट दुर्बोधता व अनुचितता हाच काव्याचा प्राण मानणाऱ्या नवकवींपर्यंत व नवकादंबरीकारापर्यंत प्रत्येकाला अक्षरशः ठोकून

काढले. अशी एखादी कविता किंवा कादंबरी वाचली की अत्रे फार अस्वस्थ होत आणि मी भेटलो की मला विचारीत, "आम्ही एक आता म्हातारे झालो पण तुला तरी या वाङमयाचा काही अर्थ लागतो का? किंवा त्यात काही अर्थ आहे असे वाटते का?" अत्र्यांची रसिकता आणि वाङमयीन समज पक्की होती. प्रभाकर पाध्ये धनुर्धारीचे संपादक असताना त्यांनी तात्यासाहेब केळकरांच्या वाङमयावर तीन चार लेख लिहून कडाडून हल्ला चढविला. एक दिवस अत्र्यांची व पाध्यांची गाठ पडली. आपल्या वैशिष्टयपूर्ण आवाजात पाध्ये अत्र्यांना जोरात म्हणाले, "केळकरांच्यावरचे माझे तीन लेख वाचलेत का? पार धुव्वा उडवला आहे. केळकरांचे साहित्य सम्राटपद हिरावून घेतले आहे." अत्र्यांनी पाध्यांना क्षणभर आपादमस्तक पाहिले व ते म्हणाले, "पाध्ये, तुमच्या टाळक्यावर समग्र केळकर वाङमयाचे वारा खंड ठेवले तर त्या बळिराजाप्रमाणे थेट पाताळात जाल. वाटेल त्या वल्गना करू नका." अत्र्यांची साहित्यातील अचूक समज म्हणतो ती ही.

वेष असावा बावळा हे समर्थवचन अत्र्यांना साफ नामंजूर होते. जगात कसे वागावे, बोलावे, चालावे या बाबतीत अत्रे फार जागरूक असत. अव्यवस्थितपणा आणि भोंगळपणा अत्र्यांना अगदी आवडत नसे. असली बारीक सारीक वैगुण्ये अत्र्यांची भेदक दृष्टी तावडतोब टिपत असे आणि त्या व्यक्तीला त्यावरहुकूम सूचना मिळत असत. अत्र्यांच्या गुहेत प्रवेश करताना आपला एकंदर 'मेकअप' ठाकठीक आहे की नाही हे पुन्हा पुन्हा बघावे लागे. शर्टाची कॉलर नीटनेटकी नसली, केस अव्यवस्थित असले, दाढी घड केलेली नसली किंवा एखादा कण जरी तोंडावर दिसला की अत्रे तावडतोब विधायक सूचना करीत. काही वर्षांपूर्वी अस्मादिकांचे वजन वाढले होते. त्यावेळी केव्हाही भेटलो की अत्रे हॅम्लेट नाटकातील त्रस्त समंधाप्रमाणे वजनाचे अवमूल्यन करण्याचा कडक इशारा देत. अत्र्यांचे हे परोपदेशे पांडित्य असले तरी ते खरे असल्यामुळे वजन घटवण्याचा प्रांजळ प्रयत्न केला. पण वजन हे हरदासी कथेप्रमाणे असते. प्रयत्नाची शर्थ केली तर ते काही काळ हटते पण परत ते मूळ पदावर येते. असे प्रयत्न अत्र्यांनी अनेकदा केले. शेवटच्या वर्षी जीवावर उदार होऊन अत्रे उरुळी कांचनला एकदा दीड महिना आणि एकदा दहा दिवस राहिले व भरपूर उपासमार करून घेतली. पण वजन कायम ते कायमच!

अत्र्यांच्याजवळ व्यावहारिक विसरभोळेपणा नव्हता. अत्युच्ची पदि थोरही—आपला मागील सगळा इतिहास विसरतो आणि बिघडतो हा बोल अत्र्यांच्या बाबतीत खोटा होता. अत्र्यांनी आपले पूर्वायुष्य कधीही इतिहासजमा केले नाही. ज्या अनेक शिडयांवरून ते वर चढले त्यापैकी एकही शिडी त्यांनी कधी लाथाडली नाही. यामुळे अत्र्यांचा दिवाणखाना कधी कधी पुराण व्यक्तींचे अजबघर बनत असे. वयोमान, व्यवहारातील पराभव, गतीचा कायदा न मानण्याचा हेकटपणा, व्यसनीपणा, उधळेपणा, बेजबाबदारपणा अशा एक ना दोन अनेक कारणांमुळे एकेकाळी प्रसिद्धीच्या व लोकप्रियतेच्या प्रकाशात दिमाखाने जगलेली ही माणसे किस झाड की पत्ती या अवस्थेप्रत पोचलेली असत. यात नट असत, संपादक असत, पुढारी असत, वृद्धानारी पतिव्रता असत, सामाजिक कार्यकर्ते असत. अशा मागासलेल्या जमाती अत्र्यांच्याकडे हक्काने येत, मानाने बसत आणि मोकळया मनाने बोलत. अत्रे हे सर्व सहानुभूतीने ऐकून घेत आणि यथाशक्ती मदतही करीत. प्रत्येकाची पात्रापात्रता या उदार माणसाला माहीत होती. तसे कधी कधी स्पष्ट बोलूनही दाखवीत. पण बुडत्यास तत्परतेने हात देत. अशा व्यक्तींची नावे प्रगट करणे अनुचित आणि अमानुष होईल. पण या निर्वासितांचे पुनर्वसन केल्यामुळे अत्र्यांच्या नाटक मंडळीला व वृत्तपत्र कचेरीला कधी कधी पांजरपोळाचे स्वरूप प्राप्त होई हेही तितकेच खरे!

## स्वतःच्या संकटकाळातही मित्रांना मदत

अल्पकालात आपल्याला मदत करणाऱ्या, आपल्याशी एकनिष्ठ राहणाऱ्या, मनोभावे कामे करणाऱ्या व्यक्तींना अत्रे कधीही विसरले नाहीत. वसंतसेना चित्रपट पडला त्यावेळी अत्र्यांच्या डोक्यावर अक्षरशः आर्थिक आकाश कोसळले होते. पण अत्र्यांनी आपल्या वळचणीला असलेल्या आश्रितांची अशा दारुण परिस्थितीतही कधीही उपेक्षा केली नाही. आपणहून जा म्हणून सांगितले नाही. उलट जे चारदोन तुकडे मिळत त्यातील एकदोन तुकडे अत्रे या माणसांच्यासाठी राखून ठेवीत. यामुळे साहेबांच्यावर प्राणांपलिकडे प्रेम करणारे व त्यांचा सतत पाठपुरावा करणारे अनेक क्षेत्रात अनेक लोक होते. यातील हनुमान म्हणजे बालमोहन नाटक मंडळीचे एकेकाळचे मालक दामुअण्णा जोशी होत. तांबडे फुटायच्या अगोदरच हा शूचिर्भूत ब्राह्मण अत्र्यांच्या दर्शनाला हजर असे. एकनिष्ठा इतकी जबरदस्त आणि एकांतिक की एकदा सहज मी या नटश्रेष्ठाला विचारले, "अमक्याचे तुम्ही नाटक पाहिलेत का?" तावडतोब उत्तर आले, "साहेबांच्या नाटकाव्यतिरिक्त कोणतेही नाटक मी बघत नाही आणि बघणार नाही." राम आहे की नाही हे पाहण्यासाठी सीतामाईने दिलेला रत्नहार कडाकड फोडणारा मारुती तरी काय वेगळा होता?

अशी डोळस नसलेली आणि 'त्वमेव सर्वं मम देव देव' म्हणणारी सरळ आणि सालस माणसे जशी अत्र्यांच्याभोवती असत त्याचप्रमाणे पोटासाठी सोंग आणणारी आणि अत्र्यांना 'पांडुरंग' म्हणणारी स्वार्थी माणसे त्यांच्या अवतीभोवती वावरत असत. अत्र्यांना या सगळ्या गोष्टी कळत. कधी कधी असल्या तोंडपुजेपणामुळे ते गुदमरत आणि कंटाळत. विनोदबुद्धी, व्यवहारचातुर्य व आयुष्यात आलेल्या बऱ्या वाईट अनुभवांचे भरपूर भांडवल गाठीस असल्यामुळे कणी कोठली आणि कोंडा कोठला हे अत्र्यांच्या तावडतोब लक्षात येई. पण स्तुतीचीसुद्धा एक धुंदी असते व व्यसन असते. अत्रे अनेकदा जाणूनबुजून व अक्कलहुशारीने या मोहाच्या आहारी जात. यामुळे प्रांजळपणे बोलणारा व कसलाही लोभ नसलेला समंजस 'मध्यमवर्ग' हा अत्र्यांच्याकडे नेहमीच अल्पमतात असे








कारण अगदी सद्‌बुद्धीने केलेली विधायक टीकासुद्धा अत्र्यांना कळत असे पण सहसा वळत नसे.

अत्र्यांच्याकडे एकेकाळी 'साहेब राजी रखना त्रे' हे ब्रीद मस्तकी धारण करणारे एक जादूगार वकील होते. काही भानगड केल्यामुळे त्यांची वकिलीची सनद त्यावेळी रद्द झाली होती. त्यांच्या प्रत्येक वाक्याचा प्रारंभ किंवा शेवट साहेब हा शब्द आल्याशिवाय होत नसे. अत्र्यांच्या सहनशक्तीला व स्तुतिप्रियतेलाही मर्यादा असल्यामुळे एक दिवस साहेब कंटाळले आणि नेमका त्याचवेळी कुत्रा मोठ्याने भुंकायला लागला. अत्रे तावडतोब म्हणाले, "अहो, वकीलसाहेब अत्रे साहेबांचे कुत्रेसाहेब भुंकताहेत त्यांना गप्प बसायला सांगा." वकीलही खमंग होते ते म्हणाले, "काय साहेब गरिबाची चेष्टा करता !"

## अत्रे परंपरावादी होते

इतकी वर्षे अत्र्यांना मी अगदी जवळून पाहिल्यामुळे व ऐकल्यामुळे त्यांच्या मताचे म्हणा किंवा व्यक्तिमत्वाचे म्हणा चोरकप्पे अकस्मात् स्पष्ट होत. अत्रे हाडाचे हिंदू होते व त्यांचा पिंड श्रद्धावान माणसाचा होता. या बाबतीत गडकरी आणि अत्रे या गुरु-शिष्यांच्या मनोवृत्तीत कसलाच फरक नव्हता. जुन्या चालीरीतींची आणि रूढींची कितीजरी चेष्टा केली तरी हिंदू धर्मातील आणि संस्कृतीतील आदर्श व्यक्ती आणि आदर्श तत्त्वे या दोघांनाही शिरोधार्य वाटत. 'घराबाहेर' नाटकात निर्मलेने मंगळसूत्र तोडले, 'जग काय म्हणेल ?' या नाटकात उल्काने आपल्या नवऱ्याला टाकले आणि 'उद्यांचा संसार' या नाटकात करुणेने आपल्या व्यसनी आणि बेजबाबदार नवऱ्याचे कितीही विदारक वाभाडे काढले तरी अत्रे बुद्धिवादी नक्की नव्हते. यामुळेच 'बुवा तेथे बाया' हे नाटक लिहिणारे अत्रे तुकडोजी महाराजांच्यापासून ते दत्ता बाळपर्यंत अनेक बुवांच्या नादी लागलेले असत. अनेक चमत्कारांच्यावरही त्यांचा विश्वास वसे. शिवशक्तीची इमारत ही मूळ स्मशानभूमी असलेल्या जमिनीवर बांधलेली असल्यामुळे भुताखेतांचेही अत्र्यांना मधूनमधून दर्शन होई. स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या पत्नी गेल्या त्या दिवशी काही कारणाने अत्रे आमच्या घरी भोजनास आले होते. सावरकरांच्या पत्नीचा विजेच्या भट्टीत अंत्यसंस्कार केला होता. ही गोष्ट अत्र्यांना मुळीच आवडली नव्हती. यावर बराच वादविवाद झाला पण 'वाहाण्यांचा मूर्खपणा अर्थात आमचे प्रेतसंस्कार' हा लेख लिहिणाऱ्या आगरकरांचे ज्यांनी स्मारक केले त्या अत्र्यांचे शेवटपर्यंत म्हणणे एकच होते "आपल्याला जुन्या पद्धतीने अग्नि द्यावा व सर्व विधी करावेत असे मी लिहून ठेवीन."

अत्र्यांच्याकडे मी नेहेमी जात असे त्यापेक्षा गेली चार पाच वर्षे काही कारणामुळे अधिक वेळा गेलो. १९६८ साली तळेगावला कॉलेज सुरू झाले. अत्रे संस्थेचे उपाध्यक्ष होते. १९६५ सालापासूनच कॉलेज काढण्याच्या प्रयत्नास मी प्रारंभ केला. एका सामान्य व्यक्तीने ज्यास लाखो रुपयेही अपुरे पडतात असा कॉलेज काढण्याचा प्रयत्न करणे ही कल्पनाच जितकी अव्यवहार्य तितकीच हास्यास्पद होती. पण उपहास न करता आणि कसलेही आडेवेढे न घेता अत्र्यांनी माझ्या स्वप्नरंजनाला सक्रिय पाठिंबा दिला. मी काय सांगत असे ते अत्रे शांतपणे ऐकून घेत. वर्गणी गोळा करणे किती कठीण असते ते आपल्या काही आठवणी सांगून पटवून देत. पण कधीही हा नाद सोडा असे त्यांनी म्हटले नाही. कॉलेज सुरू झाल्यावर प्रकृती मुळीच बरी नसताना केवळ आपल्या मित्राच्या मुलाने हा उद्योग सुरू केला आहे ही जाणीव ठेवून ते हजर राहिले. ना. बाळासाहेब देसाई केवळ त्यांच्यामुळेच आले. आज अत्रे नसल्यामुळे कॉलेज चालवताना अडचण आली की त्यांची आठवण होते. संस्था चालवताना कार्यकर्त्यांना कोणकोणती पथ्ये पाळावी लागतात याची अत्र्यांना उत्तम कल्पना होती. एक दिवस "आम्ही कॉलेज काढतो" या नांवाचा लेख लिहून मी अत्र्यांच्याकडे गेलो. या लेखात कॉलेजच्या संदर्भात काही व्यक्तींवर टीका करणारी व प्रसंग वर्णन करणारी विधाने आणि परिच्छेद होते. अत्र्यांनी लेख वाचला, चांगला आहे असा अभिप्राय दिला पण कमीत कमी दहा वर्षे हा लेख छापू नकोस असा इशाराही दिला.

## देवधर्म नि अध्यात्मावरील वाढती श्रद्धा

अत्र्यांची अखेरची दोन वर्षे अनेक कारणांनी फार वाईट गेली. सतत पाठपुरावा करणारा आजार, पायाच्या अधूपणामुळे आलेला अपंगपणा, वाढत्या वयोमानामुळे स्मरणशक्ती आणि बुद्धी यात निर्माण होणाऱ्या उणीवा, लोकसभेच्या निवडणुकीत आलेले अपयश, काही आप्तमित्रांकडून होणारा अपेक्षाभंग, यामुळे अत्रे नेहमी अस्वस्थ असत! आपल्या कर्तृत्वाचा दिन आता ढळला आहे याचीही विदारक जाणीव त्यात मिसळलेली होती. आपल्या घराण्यातील माणसे ७५ वर्षांवर जगली नाहीत, आता आपली सत्तरी उलटलेली आहे, आता यापुढे काय होईल ते सांगता येत नाही, हा विचारही अत्र्यांना मधूनमधून दंश करीत असे. या अत्र्यांच्या आयुष्याच्या सायंकाळात मी त्यांच्याकडे वारंवार जात असे. एकंदर राजकारणाची चाललेली अधोगती पाहून व रोज वाढत चाललेले अराजक बघून 'या देशाचे काय होणार ?' हा प्रश्न अत्र्यांना सतत सतावत असे. त्यामुळे अत्र्यांची देवाधर्मावरची व अध्यात्मावरची श्रद्धा वाढत चालली होती. अत्र्यांच्या आयुष्यातील सायंकाळाबद्दल त्यांच्या सहवासात असणाऱ्या माणसांना कितीतरी लिहिता येईल; पण लिहिणे उचित होणार नाही.

आचार्य अत्र्यांच्यावर लिहावे तितके कमीच आहे. कवि म्हणून, नाटककार, वक्ते म्हणून, चित्रपटकार म्हणून, संपादक म्हणून अशा कितीतरी दृष्टींनी अत्र्यांच्यावर लिहिले गेले आहे आणि पुढे अनेकजण लिहितील. गेली ३६ वर्षे मी आचार्य अत्र्यांना अगदी जवळून बघत होतो आणि ऐकत होतो. अत्र्यांनी जवळ जवळ ५० वर्षे कष्ट करून सार्वजनिक उद्योगाचा जो डोंगर उभा केलेला त्यामागे असणारा माणूस बघण्याचे भाग्य इतकी वर्षे मला लाभले आणि वेळोवेळी मला जाणवले. त्यातील काही अंश या लेखात प्रगट करण्याचा मी प्रयत्न केला आहे. खरोखर माझे भाग्य की असा माणूस इतक्या जवळून याचि देही याचि डोळा बघितला !

● ● ●

(पान ३४ वरून—**जिणे न...**)

होते. त्या दिवशी फक्त एकच डॉलर होता. तोही मी खर्च केला होता.

घरी आले. पैसे संपले होते. काय विकणं वा गहाण टाकणं शक्य आहे याचा मी विचार करू लागले. काहीच नव्हतं. देणी वाढत होती. मी कपडे उतरून आरशात पाह्यलं. माझी मलाच ती कांती मोहक वाटली. गाऊन चढवला. तेवढ्यात दार वाजलं.

मी दार उघडलं. मालक दारात उभे होते. "क्षमा करा. पण वायको म्हणत होती तुमचं भाडं थकलंय्."

"आत या ना !" मी हळुवारपणे म्हणाले. ते आत आले. वायको म्हणाली भाडं द्या नाहीतर जागा खाली करा."

"तसंच होईल. करावं लागेल. मजजवळ पैसा नाही."

"मी उसने देऊ का पाच डॉलर्स ? अन्नासाठी उपयोगी पडेल" ते म्हणाले.

"नको !" असं मी म्हणाले खरं. पण मला हुंदका दावता आला नाही. त्याने मला आठवड्याची मुदत दिली. त्याचे खाली पडलेले पैसे देताना मी वाकले. गाऊनच्या गुंड्या लावलेल्या नव्हत्या. मालकाने मला मूळ रूपात पाह्यलं.—मी लाजले. 'क्षमा करा' म्हणाले.

'तू-तू' असं म्हणत त्याने मला मिठीत घेतलं. त्यानंतर —

मालकीण भाडं वाढवीत होती.

तिचं वाढवलेलं भाडं तिला नेमाने मिळत होतं. मालक मला कृतज्ञतेने म्हणत होता—"गेल्या वीस वर्षात असं सुख मला कधी मिळालं नाही."



## अखेर घसरलेली किंमत

तुम्हाला कुठेही स्थान नसतं, तुम्हाला कुणी विचारत नाही, किंमत उरत नाही तेव्हा ते स्थान मिळावं, मूल्य लाभावं म्हणून तुम्हाला त्याची घाई होते. आपलं मूल्य प्रस्थापित करण्याची घाई, स्थान निश्चित करण्याची घाई ! ती घाई चेहऱ्यावर दिसते. डोळ्यात जणु नाचायला लागते.

तीन वर्षांपूर्वी ज्या एका निर्मात्याचा आणि माझा 'अफेअर' म्हणण्याइतपत संबंध आला होता त्याने मला खान्याला बोलावले. गेल्या गेल्या मी त्याला त्याच्या नव्या चित्रपटात भूमिका देण्यासंबंधी विचारले.

तो म्हणाला "बार्बारा, तुला एखादे लहानसहान काम देता येईलही. पण तुला त्यातून फार तर तीनशे डॉलर्स मिळतील. ते मी तुला काम न करताही देऊ शकतो. चित्रपटातला जमाना बदलला आहे. मी ढोंगी नाही. तीनशे डॉलर्स काही मी तुला उगाच देत नाही. मला तुझा सहवास हवा. हा व्यवहार आहे. सरळ, साधा-सोपा. मग काय राहशील ना इथे ?"

"किती थंडपणाने बोलतो आहेस ?"

"खरंय् ते ! पण मी प्रामाणिक आहे. चल तुझ्यासाठी फुलं घेऊन येऊ या. मला तू किती आवडतेस ते तुला ठाऊक आहे."

मी मान हलविली. ते सत्य होतं की नाही ठाऊक नाही. मला ते खरं मानणं भाग होतं.

दुसऱ्या दिवशी माझ्या पर्समध्ये तीनशे डॉलर्सच्या नोटा ठेवलेल्या होत्या. व्यवहार पूर्ण झाला होता. पुढे हाच नियम झाला. मी समजूत घालीत होते की, ही अवस्था संपेल, मार्ग निघेल.

एक मार्ग निघाला. जुगारी अड्ड्यात मी जाऊन पडले. मला ती माहिती डिकने दिली. मजा वाटली. पण माझ्याबाबत सरळ काही घडत नसे. कॅसिनोवर मी रेलून उभी रहाते हे डिकला फारसे पसंत नसावे. त्याने तसे बोलून दाखवले. मी मग मद्य जास्त घेऊ लागले. आणि त्या जुगारी अड्ड्यात मग माझा 'धंदा' सुरू झाला. तेथेही गंमतीदार माणसे भेटली. एक गुणी व पत्नीपरायण सरकारी अधिकारी भेटला. त्याने दोनशे डॉलर्स दिले. म्हणाला "हे कुणाला सांगू नकोस" मी कुणाला सांगणार होते ? सांगून काय फायदा होणार होता ? एकजण आला त्याने मला 'धाड येणार' म्हणून इशारा दिला. मी डिकला प्रामाणिक समजत होते. तो तसा नव्हता. सुदैवाने मी निसटले. ज्या निर्मात्याने मला तीनशे डॉलर्स दिले होते त्याचेकडे गेले. त्याने माझे स्वागत केले. आम्ही मजा केली. त्याने पर्समध्ये नोटा टाकल्या. मी घरी आले. नोटा पाहिल्या ! शंभर डॉलर्सच होते. मी त्याला फोन केला. तो हसला. म्हणाला "तीनशे दिले त्याला वर्ष झालं. आता शंभरच योग्य ! आपण मित्र म्हणून जवळ आलो असं मी गृहित धरलं होतं. पैसा हवा म्हणून दिला. पण तू भाव ठरवला असला तर मला तो परवडणार नाही."

टुमॉरो गुड्बाय हे त्याचं नाव! मला ते चित्र आवडले. फरक येवढाच होता की ते चित्र तयार होत असताना मला हजारो डॉलर्स मिळत








तो माझा अपमान होता. ती चेष्टा होती. अखेर मी बाजारात आले होते. मूल्य ठरलं होतं. ते सत्य मी स्वीकारलं.

त्या तिरीमिरीतच मी एका दिग्दर्शकाला फोन केला. मी त्याला आवडत होते असं तो वारंवार म्हणाला होता. "मी एकटी आहे. येतोस !" मी फोनवर म्हणाले.

तो आला. रात्रभर राहिला. सकाळी मी त्याला पैशांबद्दल विचारलं. तो म्हणाला 'मला वाटलं तू एकटी होतीस म्हणून—ठीक आहे' असं म्हणत त्याने काही द्रव्य काढून टेबलावर ठेवलं. उठताना म्हणाला "पुन्हा कधी एकटी राहिलीस तर एखाद्या लक्षाधीशाला बोलावून घे."

तो गेला. मी द्रव्य वसूल केले होते. पण मी सुखी झाले होते का ? विचार करणं बंद केलं होतं. सारे चांगले विचार दारूत बुडवून टाकले होते. दारू नसली की कळत होतं की, मी एक सामान्य बाजारबसवी आहे. एक सामान्य वेश्या. पण अजूनही कुठेतरी मन जिवंत होतं. एकदा एक वीस वर्षांचा देखणा तरुण आला. मी त्याला 'सोबत' दिली. पण त्याच्याकडून मी द्रव्य घेतलं नाही—मनाच्या समाधानासाठी ! !

## मद्य आणि कविता

भाव घसरला की घसरला. घसरलेला भाव बाजारात चटकन पसरतो. शंभरवरून पन्नास डॉलर्सचा भाव मीच स्वीकारला आणि मग तो पाच डॉलर्सइतका खाली उतरला.

गरजवंताला अक्कल नसते हेच खरं.

मला अन्न, वस्त्र, निवारा व मद्य हवं होतं. लग्न हा मार्ग होता. पण मी लग्नाची स्त्री राहिले नव्हते. मधुन मधुन कविता लिहीत होते. पैसे कमी मिळत. पण मी सामान्य वेश्या नाही. कवयित्री आहे हे समाधान मला मिळत असे.

एके रात्री एक निग्रो माझ्याकडे आला. त्याने सारं जीवन पाहिलं. मला मदत हवी आहे याची जाण त्याला आली. मला त्याने फोन नंबर दिला. मी त्याचेकडे गेले. त्याने मला अन्न व मद्य भरपूर दिले. दिवस पार पडत होते. रात्री खायला उठत होत्या. पण कविता मला तृप्ती देत होती.

एकदा एका निग्रोने मी त्याचं मानलं नाही म्हणून माझं पोटच फाडलं. अडतीस टाके घालावे लागले.

सारं कसं समोर दिसतंय्—सारं आयुष्य ! वैभव, कीर्ती, पैसा—सुंदर पुरुषांचे पत्नीपद—मान, प्रसिद्धी—मग मी घसरले कशी? काय घडलं ? दैवाचाच तो खेळ होता. मला लाज वाटत नाही. जे आलं ते मी माझ्या मगदुराप्रमाणे स्वीकारलं. भोगलं.

आणि अचानक ——

फ्रँक सिनात्रा ऑफिसातून फोन आला. 'फार फॉर टेक्सास-' मध्ये काम करशील ?"

माझा विश्वासच बसेना. मी झटकन 'हो' म्हणाले.

वर्षात प्रथमच मी सौंदर्यप्रसाधन केंद्रात गेले.

सेटवर गेले.

सर्व जण चांगले बोलले, वागले. मजा होती. मी स्वतःला विचारीत होते "मला हे यशस्वीपणे जमेल ? परिस्थितीत हे अशक्य कां वाटावं ?" दुसरं मन म्हणत होतं.

"बार्बारा कुठे होतीस इतके दिवस ?" एक जुना मित्र म्हणत होता.

"मी जगत होते"—मी उत्तरले.

उत्तरावर जाऊ नका. जरा अधिक सहानुभूतीने ह्या आयुष्याचा विचार करा.

**[ समाप्त ]**

[पान ३१ वरून—**सुप्रिया**]

ऐकताच तो दचकून उठला.

"तू काय म्हणालीस ?"

"तुझ्या मुलीचं नाव आहे राधा".

त्याला सारं नाकारायचं होतं. त्याने माझ्या डोळ्यात पाहिलं आणि त्याला धीर झाला नाही. तो गप्प राहिला.

"राजेश, तू मला खोटं कशाला सांगितलंस ?"

"कारण मी तुझ्यावर प्रेम करतोय."

"तू जर माझ्यावर खरंच प्रेम करत असशील, तर तुझ्या या खोटया गोष्टी कळल्याने, मला किती दुःख झाले असेल याची कल्पना आली असती."

"पण माझं खरंच तुझ्यावर प्रेम आहे."

अन् आता मात्र माझं डोकं खरंच भडकून गेलं. "तू माझ्यावर प्रेम करण्याच्या लायकीचा आहेस असं मला बिलकूल वाटत नाही. पण झालं गेलं होऊन गेलं. तू कारण मात्र सांगू नकोस." मी चादर फकली आणि बाथरूममध्ये गेले.

पांढऱ्या शुभ्र टबामधल्या पाण्याला निळसर झाक मारत होती. मी टबात बसले. थोडया वेळाने डोळे झाकले. खोलीतून बिलकूल आवाज येत नव्हता. मला वाटतं, मला जखडून ठेवावं याचा राजेश विचार करत होता. मला त्याच्याबद्दल आता तिरस्कार वाटत होता. त्याच्या चालण्याचा मी आवाज ऐकला. त्याने आत डोकावले. त्याचा चेहरा काळवंडला होता. त्याला आत येण्याचा काही धीर झाला नाही.

"आपण आता एकमेकांना भेटायचं नाही हेच ठरवलं असणार तू !" तो शांततेचा भंग करीत म्हणाला.

"कोण म्हणतंय ?" मी अंगावर साबणाचा फेस फिरवत म्हणाले. आपण अधूनमधून नक्की भेटायचं. पण पूर्वीसारखं अर्थात नाही." त्याला थोडं बरं वाटलं. तो आत आला.

"मी तुला साबण लावू ?"

"लाव ना माझ्या पाठीला."

राजेशने स्पंज घेऊन माझ्या पाठीला चोळायला सुरुवात केली. मी समोरच्या आरशात पाहिले, आणि स्वप्नरंजनात गुंगून गेले. मी राजेशची मालकीण आहे आणि राजेश माझी मोलकरीण आहे असं मला वाटू लागलं.








"पुरे आता" मी म्हणाले. राजेशने झटकन टॉवेल घेतला आणि मागं पकडला. मी माझं शरीर त्यात गुंडाळलं. त्यानं टॉवेलनं माझं शरीर पुसायला सुरुवात केली. मी स्तब्ध होते. माझी निष्क्रियता हीच माझी संमती समजून तो मला कुरवाळू लागला. मी त्याला ढकलले. त्याबरोबर माझ्या अंगावरचा टॉवेल खाली पडला. मी तशीच बाहेरच्या खोलीत गेले. राजेश बाथरुममधले पाणी घालवायसाठी थांबला.

कपडे करून मी खोलीतले सामान पाहू लागले. ड्रेसिंग टेबलावर कासवाचे कवच असलेली एक सोन्याची पावडरची डबी होती. का कोण जाणे, ती आपल्याला घ्यावी असं मला त्यावेळी वाटलं. मी ती उचलली आणि पर्समध्ये टाकली. खरं-म्हटलं तर त्या डबीचा मला काहीच उपयोग नव्हता, पण केवळ असूया म्हणून ते कृत्य माझ्या हातून घडलं.

राजेशने बिछाना व्यवस्थित केला आणि साऱ्या गोष्टी जागच्या जागी आहेत की नाही हे तो पाहू लागला, तेव्हा त्याला मी म्हणाले, "तुझ्या मालकीणीच्या काहीच लक्षात येणार नाही, घाबरू नकोस. तुझी नोकरी जाण्याची काही भीती बाळगू नकोस. चल जाऊ आता." राजेशच्या कपाळावर एक सूक्ष्म आठी उमटलेली मला दिसली.

गाडीत बसेपर्यंत आम्ही दोघं काहीच बोललो नाही. एव्हाना खूप रात्र झाली होती. गाडी सुरू झाली आणि इतका वेळ आणलेला ताठरपणा एकदम संपला. मला अगदी गळल्यासारखं वाटू लागलं. मला रडू कोसळलं. राजशने माझ्याशी केलेल्या प्रतारणेने, मला संताप आला होता. त्याच्याचमुळे मला मनस्ताप भोगावा लागत होता.

"हे असं कां वागलास राजेश ? मला तू कां फसवलंस ? मी हे आता सारं कसं विसरू, कसं विसरू ?" पुढे माझ्या तोंडातून शब्द उमटेनात. डोळ्यातून ओघळणारे अश्रू मी पुसून टाकले. गाडी थांबताच मी उडी मारली. त्याच्या हातात हात दिला—आणि त्याला बोलायला न देताच चेहऱ्यावर हसू आणत घरच्या जिन्याची पायरी चढू लागले.

[ क्रमशः ]

---

[पान ८ वरून—**मास्कारेन्यस**]

आफ्रिकन वसाहतींची सोन्याची खाण बंद पडली तर पोर्तुगाल रसातळाला जाईल. सध्या 'नाटो' संघटनेतील राष्ट्रे पोर्तुगालला सर्व प्रकारचे साहाय्य करीत असतात.

पोर्तुगीज लोक कसे आहेत असे मी विचारताच डॉ. मस्कारेन्यास म्हणाले, 'पोर्तुगाल नागरिक स्वभावाने प्रेमळ. भारतीयांशी वागायला फारच चांगले. तुरुंगात असताना निरनिराळ्या राजबंद्यांशी माझे निकटवर्ती संबंध जुळून आले. पोर्तुगीज जनतेला भारताविषयी फारशी माहिती नाही. जी माहिती आहे ती सरकारने पुरविलेली असत्य, विकृत व खोडसाळ. पोर्तुगीजांना भारताविषयी, भारतीय संस्कृतीविषयी, भारतीय साहित्याविषयी अद्यावत् परिचय करून देण्याची फार आवश्यकता आहे.

## एकाकी जीवन कसे कंठिले ?

आपण इतकी वर्षे गोव्याबाहेर घालविली. पत्नीला सोडून एकाकी जीवन कंठिलेत. आपणास हे एकाकी जीवन कसे काय सहन करता आले या माझ्या प्रश्नाला उत्तर देताना डॉ. मस्कारेन्यास एल्साकडे प्रेमभरी नजरेने पाहून म्हणाले, 'पत्नीने उत्कट प्रेम व देशाविषयीचे जाज्वल्य प्रेम या दोन प्रेमाच्या जबरदस्त दोरखंडांनीच माझी नौका सुरक्षितपणे किनाऱ्याकडे खेचून आणली. पत्नी शरीरानं माझ्याबरोबर नसली तरी मनानं होती. सहस्रावधी मैल दूर राहूनसुद्धा ती मला माझ्याजवळ असल्याची जाणीव व्हायची. तिची प्रेमळ पत्रं, पत्रांतून व्यक्त होणारं माझ्यावरील नितांत प्रेम, माझ्यावरील दृढ श्रद्धा व माझ्या परत येण्याच्या वाटेकडे लागलेले तिचे डोळे यामुळे मला निराशेच्या अंधारात आशेचा किरण दिसायचा.माझ्या मुक्ततेच्या श्रेयाचा सिंहाचा वाटा मी माझी पत्नी एल्सा हिला देतो."

## अविरत लेखन

आयुष्यातील मोलाची दहा वर्षे तुरुंगात घालविलेली, हृदयविकाराने पछाडलेले, शरीराने सत्तरी ओलांडलेली अशा परिस्थितीतसुद्धा डॉ. मस्कारेन्यास उपेन्द्र राज यांनी आखलेले मनसुबे थक्क करून सोडणारे आहेत.

मी त्यांच्या सान्निध्यात या मुलाखतीच्या निमित्ताने जवळजवळ साडेतीन तास होतो. तेवढ्या अवधीत ते अधूनमधून आपल्या लिखाणावरून नजर टाकीत होते. मधूनमधून दुरुस्ती करीत होते. तपानंतर भेट होऊनसुद्धा त्यांनी मला ओळखलं. प्रेमानं, दिलखुलास गप्पा केल्या. आमची चर्चा चालू असताना त्यांच्या पत्नी एल्सा यांनी आदर्श गृहिणीला शोभेल एवढ्या तत्परतेनं आदरातिथ्यही केलं. त्यांच्या पत्नीच्या चेहऱ्यावर आनंदच आनंद ओसंडून वाहताना दिसला. नवऱ्याच्या देशभक्तीचा सार्थ अभिमान आढळला. शेवटी मी त्यांना विचारलं, 'काय हो, हा सारा व्याप तुम्ही आता या वयात मागं लावून घेणार ? का म्हणून ?' "का? माझ्या मायभूमीसाठी व माझ्या देशवांधवांसाठी मी हे करणार आहे. कारण मी रक्ताने व जन्माने भारतीय आहे."

डॉ. मस्कारेन्यास यांचे ते उत्स्फूर्त उद्गार ऐकून मला त्यांनी पोर्तुगालच्या कोर्टात दाखविलेली बाणेदारपणाची आठवण झाली. **'गोवा हा भारताचा अविभाज्य भाग आहे. भारत सरकारने गोवा जिंकून घेतला नसून तो मुक्त केला आहे. मी भारतीय आहे. माझे वाडवडील भारतीय होते. मला माझ्या भारतीयत्वाचा अभिमान वाटतो."** असे ठणकावून सांगणाऱ्या डॉ. मस्कारेन्यास यांचा तोच आवेश माझ्या या प्रश्नाला उत्तर देताना जाणवला. त्यांच्यातील दिव्यत्वाचा साक्षात्कार घडला.मुलाखत आटोपून परतताना नकळत कविवर्य बोरकरांच्या त्या गाजलेल्या कवितेच्या ओळी माझ्या मुखावाट बाहेर पडल्या

**" दिव्यत्वाची जेथ प्रचीति ।**
**तेथे कर माझे जुळती ! "**

● ● ●

